

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष १७ वे ] डिसेंबर १९६३ [ अंक ३



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.

अनुक्रमणिका






प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचे मासिक

वर्ष सतरावे
अंक तिसरा

# नवभारत

डिसेंबर
१९६३

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )

*संपादक-मंडळ*

प्रा. **वि. म. बेडेकर**— प्रा. **गोवर्धन पारीख** का. संपादक



**वार्षिक रु. ९** **सहामाही रु. ५** **अंकास रु. १**

हे मासिक श्री. **म. शं. साठे** यांनी **दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई** येथे छापून प्रा. **वि. म. बेडेकर** यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक, 'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा–मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक, C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा )

३ चौकशी : श्री. वा. वि. कोनकर
१८८ एफ्, भीमरावबाडी, मुंबई २
फोन नं. २३५५४

प्रा. न. र. फाटक

# रामदासी वादाचा परिचय : ३ :

जांबेस समर्थांच्या उभ्या पार्थिवमूर्तीकरिता देवालय उभारण्याची स्फूर्ति झाल्यानंतर २८ वर्षें कै. शंकर श्रीकृष्ण ऊर्फ नानासाहेबांनी त्या स्फूर्तीला साकार करण्यासाठी उद्योग चालविला होता. परंतु त्याला खरा वेग मंदिर उभारण्यापूर्वीच्या सात आठ वर्षांत चढला. नानासाहेबांनी जेथे महाराष्ट्राची वस्ती दिसेल तेथे जाऊन समर्थांच्या नावाने द्रव्ययाचना केली व ज्या दिवशी समर्थमंदिरात समर्थमूर्तीच्या स्थापनचा सोहळा झाला त्या दिवसापर्यंत त्यांनी साडेसेहेचाळीसावर थोडी एवढी रक्कम त्यांच्यापाशी जमल्याची नोंद या सोहळ्याच्या हकीकतीचे जे लहानसे सचित्र पुस्तक "श्रीसमर्थमंदिर-जांब' या नावाने (श्रीसांप्रदायिक वृत्त, चर्चा, जीर्णोद्धार वगैरे खंड पांचवा) प्रसिद्ध केले आहे, त्याच्या सुरवातीसच पाहायला सापडते. या रकमेतून मंदिराची उभारणी, मूर्तीची औंधाहून नेआण, सोहळ्याच्या धार्मिक कृत्यासाठी पाचारलेल्या वैदिकांची संभावना, जांबेस उत्सवानिमित्त चाललेली भोजने इत्यादि कामे पार पाडली." वर्गणीकरिता दौऱ्याचे नानासाहेबांना अतोनात श्रम झाल्याचे कल्पनेनेसुद्धा जाणता येण्यासारखे आहे. समर्थांविषयी लोकोत्तर श्रद्धा असलेला दुसरा पुरुष कालच्या व आजच्या महाराष्ट्रात दाखविणे अशक्यप्राय आहे.

### समर्थांचे जन्मघर

समर्थांच्या चरित्रातील आख्यायिकेप्रमाणे त्यांनी आपल्या वयाच्या बाराव्या वर्षी जे जांब गाव सोडले ते त्यांनी कायमचेच सोडले. कारणपरत्वे ते जांबला केव्हा केव्हा गेल्याच्या कथा आहेत, पण तेथेच राहावे, असे त्यांच्या मनात कधीच न आल्याची साक्ष त्यांचे चाफळचे श्रीराममंदिर व सज्जनगडावरील समाधि ही स्थळे निरंतर पटविणारी आहे. जांब हे अगदी लहान गाव आहे, गावालगत एक ओढा आहे, विहिरी पुष्कळ आहेत, परंतु समर्थप्रताप नावाच्या गिरिधरांनी लिहिलेल्या चरित्रात या गावी ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्रांची वस्ती अगदी स्वतंत्र आणि विस्तीर्ण असल्याचे मनसोक्त वर्णन ज्यांनी आधी वाचले असेल त्यांची ते गाव प्रत्यक्ष पाहिल्यावर प्रखर निराशा व्हावी, इतके ते गाव लहान आहे. पूर्वी केव्हा तरी ते विशाल असेल या कल्पनेला तेथील व आसपासची भूमी कसलाच आधार पुरवीत नाही. असे हे गाव समर्थांनी त्यागले तरी तेथे त्यांची दगडी प्रतिमा आणून बसविण्याचा हट्ट नानासाहेबांनी धरला व महाराष्ट्राच्या पैशाने शेवटास नेला. समर्थांनी ते गाव सोडले, याचे ते विरागी होते, यांकडे लक्ष देऊन थोडे तरी मंडन करता येईल. त्यांची गादी वापरणाऱ्या वारसदारांनी त्या गावाकडे अशीच पाठ फिरवावी, समर्थ जेथे जन्मले त्या घराचीसुद्धा दखल बाळगू नये, हा प्रकार आश्चर्य वाटण्याजोगा आहे. ते घर समर्थांच्या घराण्याकडे राहिले नव्हते, मंदिर उभारण्याच्या वेळी ते दुसऱ्याकडून विकत घ्यावे लागले, ही माहिती जरी समर्थमंदिराच्या वृत्तान्तात नानासाहेबांनी स्पष्ट नमूद केलेली नसली तरी त्यानी या घराच्या रचनेतील अवघ्या तीन चार वर्षांत झालेल्या फेरबदलाची जी वाच्यता त्या वृत्तांतात केलेली आहे ती पाहिल्यास त्या घराची मालकी बदलत असल्याबद्दल शंका रहात नाही. समर्थांच्या कार्याचे उत्तराधिकारी चाफळच्या वाड्यातील ऐषआराम ( तो संस्थानिकांच्या मानाने काही प्रमाणात कमी असेल ) डावलून कुग्रामाच्या अवस्थेस उतरलेल्या जांबेस कशाला जातील ? जे घर मोडून तेथे समर्थमंदिर बांधले तेच घर नेमके समर्थांचे जन्मस्थान कशावरून ? या प्रश्नाला परंपरा आणि नानासाहेबांची तिच्यावरील भयंकर श्रद्धा, असे उत्तर सापडते. देवळाच्या बांधकामाला सुरुवात करण्याची निजामसरकाराची परवानगी मिळण्यापूर्वीच ते घर पाडून टाकले होते. (जांब तेव्हा निजामशाहीत होते ) मोकळी जागा पाहून "तिचा गावातील अजाण लोक, त्यातल्या त्यात लहानमुले दुरुपयोग करीत म्हणून कागाळ्या येऊ लागल्या.








तेव्हा एका वर्षी अगाऊ ठरवून ...... ती जागा झाडून काढली, तीवर दाट सडा घातला व रात्री त्या जागी भजनं प्रवचनें वगैरे केली. तरीपण पुन्हा कालान्तराने ल्हान मुलांनी आपला स्वभाव सोडला नाहीच." असे नानासाहेबांनीच लिहून ठेवले आहे. समर्थाविषयी गावकऱ्यांमध्ये किती श्रद्धा होती, याचा हा पुरावा आहे. शेवटी १९२७ मध्ये परवानगी हाती येऊन १९२८ पौष पौर्णिमेला चाफळसंस्थानाधिपतींच्या हस्ते मंदिराचा पाया खोदण्याचा समारंभ झाला.

## रामदासांच्या गोट्या

पाया खणला जात असता नानासाहेबांची समर्थ-विषयक श्रद्धा त्यांना एखाद्या दिवशी काय सुचवीत असे याचा एक मासला येथे सादर करण्याला हरकत नाही. "चवदा फूट पाया खोल गेल्यावर एके दिवशी तळाशी जाऊन बसलो असता ...... मनात आले की, आपण बसल्या जागी असताच ...... वर पाया भरतील आणि वर श्रीसमर्थांच्या मूर्तीची स्थापना करतील, तर ते केवढे उपकार होतील! पण एवढे भाग्य कोणाचे!" नानासाहेबांनी लिहिलेल्या वृत्तान्तात एक गोष्ट गाळली आहे. तिचा उच्चार आणि वाद १९३० मध्ये तळेगावास भरलेल्या समर्थवाङ्मयपरिषद् या नावाने भरलेल्या बैठकीत झाला होता. पाया खणताना काही खोलीवर खेळण्याच्या गोट्या सापडल्या. एका समर्थचरित्रकाराने लहानपणी समर्थांना गोट्या खेळण्याचा नाद होता, असे लिहिले आहे. रामदासांचा जन्म झाला, त्या घराच्या जागी नव्या इमारतीकरिता पाया खणताना ज्या अर्थी गोट्या सापडल्या त्या अर्थी त्या रामदासांच्या खेळातल्याच गोट्या, असा नानासाहेबांना साक्षात्कार झाल्याप्रमाणे त्यांनी त्या गोट्या मस्तकी धरल्या व त्यांच्या जतनाची तजवीज केली. कालान्तराने त्या गोट्या कौतुकाने पाहाणाऱ्या एका छोटया महाराष्ट्रीय संस्थानिकाजवळ नानासाहेबांनीं उद्गार काढले की, तुमची राज्ये ओवाळून टाकावी अशी ही अलभ्य वस्तु आहे. या गोट्याचा संदर्भ देवांनी तळेगावच्या पूर्वनिर्दिष्ट बैठकीत काढला तेव्हा एकाने प्रश्न केला की त्या गोट्या शुद्ध दगडीच आहेत का पोर्सलेनच्या आहेत? पोर्सलेनच्या असतील तर त्या तीनशे वर्षापूर्वीच्या नाहीत, असे सिद्ध होऊन प्रश्न निकालात निघेल. देवांनी त्या दगडाच्या आहेत असे म्हटल्यावर एक शंका मिटली. दुसऱ्याने विचारले की गोट्यांचा आकार केवढा आहे? आकाराशी काय कर्तव्य, अशा स्वरूपाच्या देवांच्या पृच्छेला "रामदास हा मारुतीचा अवतार असल्याच्या कल्पनेमुळे त्यांच्या गोट्या न जाणो, नारळाएवढया-सुद्धा असायच्या. मारुतीला लिंबाएवढया, बेलफळा-एवढया गोट्या काय कामाच्या, म्हणुन आकाराचा प्रश्न केला." या उत्तरावर जी तोड होती ती देवांनी उपयोगात आणली नाही. त्यांचा 'आहेत साधारण कागदी लिंबाएवढया' हा खुलासा ऐकून गोट्यांची चर्चा थांबली. रामदास हे मूळचे हनुमान असले तरी मनुष्यरूपात येऊन त्यांना सामान्य माणसांतच वावरा-यचे होते, यामुळे सामान्य माणसांना झेपणाऱ्याच गोट्या त्यांनी स्वीकाराव्या हेच उचित, अशी एक तोड बोलून प्रतिपक्षाच्या तोंडाला देव खीळ घालू शकले असते.

त्या गोट्या रामदासांच्याच कशावरून? रामदास जन्मल्याला पाया खणला त्यावेळी ३२० वर्षे उलटली होती. (इ. स. १६०८ हे जन्मवर्ष आणि इ. स. १९२८ हे पायाखणणीचे वर्ष) या कालावधीत रामदासांच्या जन्मघराने कितीतरी स्थित्यंतरे पाहिली असतील. या स्थित्यंतरांच्या चक्रात मूळ घराचा पाया जसाच्या तसाच राहिला, असे मानण्याला देवांचीच निष्ठा पाहिजे. घराखालच्या जमिनीने आपल्यावरील घराच्या उलथापालथी होत असता रामदासांच्या गोट्या मात्र आपल्या पोटात राखून ठेवल्या आणि समर्थमंदिराचा पाया खणणारांच्या नजरेस आणून दिल्या, हे गृहीत करायला देवांचीच दारुण श्रद्धा पाहिजे. रामदासांनी जांब सोडले व त्या दिवसापासून त्या गावातला गोष्टींचा खेळही लोपला, इतका की त्यांचे ज्ञान किंवा स्मरण यांतले काहीच तेथच्या लोकात उरले नाही. गोट्या रामदासांच्याच हा निर्णय तर्कवितर्कांची बुद्धीतून हकालपट्टी केल्याखेरीज पटणारा नाही. तळेगावच्या बैठकीत चर्चा व्हावी म्हणून देवांनी समर्थप्रतापातली सुमारे ७० दुर्बोध विधाने आणली होती. अंध श्रद्धाळूंच्या असंभाव्य अतिशयोक्तीला वस्तुस्थिति ठरवून तिचा खुलासा बैठकीच्या भागी-दारांनी करावा, ही देवांची आकांक्षा सफळ झाली नाही हे वेगळे सांगावयाला नको. जांबेच्या मंदिरबांधणीचा










देवलिखित वृत्तान्त गोटयांपुरता उणा असल्याने गोटयांची माहिती सांगितली, आता सोहळयाकडे वळणे बरें.

### परतूड ते जांबचा प्रवास

पुढील माहिती समर्थमूर्तिस्थापनेपूर्वीच्या तीन दिवसातली आहे. चैत्री नवमीला रामदासांचा जन्म झाला म्हणून जांबेस दगडी प्रतिमेच्या रूपानें १९३२ मध्ये ३२४ वर्षांनी समर्थमंदिरात त्यांचा पुनः जन्म व्हावयाचा होता. स्थापनेच्या स्वाहाकारादि धार्मिक विधीचा चैत्र शु० २ रोजी प्रारंभ झाला होता. लोक येऊ लागले. मनमाड–औरंगाबादच्या रेल्वेवर परतूड नावाच्या स्टेशनवरून जांबेस बैलगाडीने सुमारे १५ मैल जाण्याचा प्रसंग होता. समारंभाकरिता उतारूंची मोटारलॉरी कशीबशी जाईल इतपत निजामशाहीच्या राजा सर किसनप्रसादांनी कची वाट तयार केली होती व त्यावरून हे वाहन चैत्र शु० ५ ला प्रथम परतुडाहून जांबेस गेले तेव्हा १५ मैलाचे अंतर संपवायला त्याला ५ तास लागले. तो रस्ता धोक्याचा असल्याबद्दल देवांनी आपल्या वृत्तान्तात स्वच्छ कबूली दिलेली आहे. समारंभाच्या दिवसात या वाहनाचा उपयोग चालू होता, पण अपघात घडला नाही. मनमाडची गाडी परतूडला पहाटेस पोचत होती. नवाकाळतर्फे जे तिघेजण गेले, त्यात नवाकाळचे संपादक असूनही जांबेस आलेल्या लोकात त्यांचा नामोल्लेख देवांच्या वृत्तान्तात नाही. रामदासी वादाच्या व्यक्तीचा निर्देश नसावा हे योग्यच समजावे लागेल. नवाकाळच्या फोटोग्राफरबद्दल मात्र थोडासा मजकूर आहे. परतूडला उतरलेल्या जांबेच्या समारंभ-यात्रेकरूंना जेव्हा रामदासी राजकारणाचा वादकर्ता आल्याचे समजले तेव्हा एखाद्या अदृष्टपूर्व वन्य श्वापदाला पहाण्यासाठी लोकांनी जमावे, तसे त्याच्या भोवती कित्येक जमले. परतूडच्या स्टेशनमास्तराकडे येणारांना जांबेच्या वाटेस लावण्याचे काम होते. त्याने एक बैलगाडी आणीपर्यंत वादकर्त्याभोवती कोणी जमावे, पांगावे, अशी मौज जवळजवळ अर्धा पाऊण तास चालली होती. नवाकाळची त्रयी गाडीत बसली व गाडी चालू लागली. दिवस उन्हाळ्याचे म्हणून गाडीवर छप्पर नव्हते. वाटेत मधून मधून ठेंगण्या शिंदीच्या काटेरी झाडांचा प्रदेश होता. तो जवळ आला की गाडीवानाने ‘ महाराज पालथे व्हा ’ असा इषारा द्यावा, उतारूंनी तसे करावे आणि त्या झाडांच्या काटेरी फांद्या उतारूंच्या पाठीवरून चरचरत जाव्या. याप्रमाणे फार वेळ पडावे लागत नव्हते, हेच काय ते या अनुभवातले समाधान होते. दिवस चांगला उगवेपर्यंत तीन चार वेळा तरी असे समाधान वाटयास आले. उजाडल्यावर शिंदीची राने संपली व वाढत चाललेल्या उन्हाचा त्रास सोशीत जांब केव्हा येणार या चिंतेने पछाडले. पडतूर ते जांबेच्या मजलेत कुठे पाणी मिळण्याची आशा नव्हती. सगळा रस्ता धुळीचा. पडतूर सोडले तो सुमार पहाटे पाचाचा होता. जांबेस पोचलो तेव्हा १२ वाजून गेले होते. जांबेस नव्या मंदिराजवळ भरपूर गोड व गार पाण्याची एक मोठी विहीर होती तेथे जाऊन जलपान, स्नान करण्यापूर्वी कपभर चहा मिळावा अशी इच्छा खरी, पण गावात शिरताना चहा न पिण्याबद्दल मोठाल्या छापील सूचना पाहून चहाबद्दल कमालीची निराशा झाली. तथापि आधी देवांच्या दृष्टीस पडावे आणि मग इतर कर्तव्याकडे वळावे, असे ठरवून देवांचा शोध काढला. मंदिराचे काम अपुरेच होते, तरी एका ओवरीत देव एकटेच ग्रंथ वाचीत बसले होते. ‘ समर्थ प्रताप ’ हा तो ग्रंथ होता. “ नानासाहेब ” या हाकेला मौन सुचविणारी हाताची हालचाल त्यांनी केली. इतक्यात त्यांचे ज्येष्ठ चिरंजीव कै. आबा हे पुढे आले. मौनसूचक हस्तचेष्टा व आबाचे दर्शन यात अर्ध्या मिनिटाचा फार तर अवधि असेल, पण तेवढ्यात वाचन शेवटास “ आबा, तू आलास; किती वेळ झाला ? ” असा प्रश्न करीत देवांनी बैठक सोडली. आबाची व इतर मुलांची चौकशी संपवून मग त्यांच्या दृष्टिपथावर आबाच्या आधी येऊन तिष्ठणारांची विचारपूस आरंभली. ती एक दोन मिनिटात आटपून आबासह ते आपल्या निवासस्थानी चालते झाले.

### चहा मिळाला

पुढे विहिरीवर जाऊन स्नान, कपडे धुणे ही कामे निकालात काढून चहा मिळावा, जेवणाची तजवीज कळावी, वैगेरे उद्देशाने स्वाहाकाराच्या जागेबाहेर उभे असता मुंबईचे एक परिचित वैदिक पानतंबाखूची तलफ भागविण्यासाठी बाहेर येताना दिसले. केव्हा आला, काय पाहिजे या प्रश्नांना आताच तासापूर्वी आलो.








स्नानकर्म आटोपले, पण चहा पाहिजे असे उत्तर देताच "चहा मिळणे ही विशेष संकटाची बाब नाही," चला माझ्याबरोबर" असे म्हणत ते स्वाहाकारी वैदिक निघाले. "अहो, चहा कसा मिळणार? चहाच्या बंदीची ही पाटी पहा." ते वेदमूर्ति अशा पाट्यांनी दडपून जाणारे नव्हते. "पाट्यावरील सूचना अमलासाठी नसतात हे मुंबईस इतकी वर्षे राहून अद्यापि तुम्हाला कळलेले नाही, असे कसे मानावे? त्या पाट्या घाला चुलीत व त्यावर उकळून काढा चहाचे पाणी. तुम्हाला चहा मिळण्याशी कारण. पाट्यावरील सूचनांची पंचाईत हवी कशाला? चला माझ्याबरोबर, मी चहा मिळवून देतो." असा पानतंबाखू चघळीत जिभेचा पट्टा चालवीत ते आपल्या परिचितांना समारंभाच्या पाकशाळेत घेऊन गेले. त्या जागी जे गृहस्थ भेटले ते करमरकर आडनावाचे होते. त्यानी अभ्यागताचे नाव ऐकताच त्याच्या मुंजीत अजमेरला हजर असल्यापयत ओळखीचा धागा मागे नेला. हा धागा बादरायणसंबंधासारखा नव्हता, वेदमूर्तींनी 'अशी जुनी ओळख असेल तर अगोदर यांना चहा द्या पाहू' असे करमरकरांना बजावून वेदमूर्ति स्वाहाकारस्थळी घाईने गेले. इकडे करमरकरांनी 'येथे समर्थांच्या घरी काय कमी आहे? चार पाच मिनिटात चहा मिळेल.' असे अभ्यागतांना सांगून जवळच एक तरुण रामदासी ब्रह्मचारी 'श्रीराम जयराम जयजयराम' या तेरा अक्षरी तारक मंत्राचा जप करीत होता त्याला स्टोव पेटविण्याचा हुकूम फर्माविला. त्याने जपाच्या व्रतात खळ पडू नये म्हणून मानेने संमति दर्शवून स्टोव आपल्यापुढे घेतला. स्टोवच्या पंपाचा दांडा आतबाहेर ढकलता ओढताना तो या मंत्राचे शब्द ठेक्यात म्हणत होता. त्याची ही समंत्रक हालचाल हसावयास लावणारी होती. वाईच्या श्री. चौंडेबुवांनी बरोबर तुळसीकाष्ठांच्या माळा लहानसे पोते भरेल इतक्या आणल्या होत्या व जो कोणी मंत्रजपात भागीदार होऊ इच्छील, त्याला माळ द्यावयाची व दिवसात जपाची संख्या किती झाली याचा हिशेब टिपून ठेवायचा, अशा रीतीने प्रतिमास्थापनेच्या दिवसापर्यंत एकूण १३ कोट जप पूर्ण केल्याची नोंद देवांच्या वृत्तांतात आहे. त्यात माळा वाटल्याची माहिती मात्र नाही. चहा करणारा ब्रह्मचारी जपकर्माचा भागीदार असल्याने ह्या कर्मात खंड न पडू देता, त्याने चहा तयार करून दिला.

चहाचा कप ओठाशी नेणार तोच देवांची स्वारी तेथे आली. चहा न पिण्याचा आदेश मोडल्याबद्दल आता ते कोणत्या शब्दानी चहापिपासूंची पूजा बांधतात याची वाट पाहात कप खाली ठेवून त्यांच्या प्रश्नाला 'लिंबाचे सरबत' असे उत्तर दिले. त्यानी त्या उत्तराची थट्टा करून चहा शिल्लक असल्यास तो स्वतःस मिळावा अशी इच्छा दर्शविली; ही इच्छा चमत्कारासारखी वाटली. नंतर चहाचा घोट गिळला तेव्हा बाहेर प्रगटलेली मनाई व चहा पिणे याची संगति कशी लावायची, या सवालाने ते चिडले आणि राणा भीमदेवी आवाजात ठासून म्हणाले:- 'बाहेरच्या मनाईला न जुमानता मी चहा प्यालो, असे पाहिजे तर वृत्तपत्रातून प्रसिद्ध करा' त्यानी मग संथपणे चहापान समाप्तीस नेले व इकडे तिकडे न बघता व कुणाशीही न बोलता आपल्या कामास निघून गेले. देवांना चहाची आवड नव्हे चटक होती, हे ज्यांना ठाऊक होते त्यांना त्या मनाइच्या इशाऱ्याचा विस्मय वाटत होता. अखेरीस वेदमूर्तींनी मनाई विषयी जे भाष्य कानावर घातले होते तेच शंभर टक्के खरे, असा निष्कर्ष सदर चहा प्रकरणाने गळी उतरविला.

## जांबेतील समर्थांची स्थळे

दिवस उलटताना समर्थांच्या बाल्यावस्थेशी ज्यांचा संबंध दृष्टीस पडतो, ती स्थळे कुठे आहेत, अशी देवांकडे चौकशी केली. मारुति, रामदासांनी जेथे उडी मारून डोक्याला जन्मभर पुरणारे टेंगूळ जोडले तो डोह, रामजी-शामजी (रामदासांचे पुतणे) यांच्या समाधि वगैरे जागांचा पत्ता देवांनी सांगितला. या स्थळात एक पंचवटी आहे, ती तुम्ही पाहू नये, असे मला वाटते' हे उत्तर पंचवटीबद्दलच्या चौकशीच्या वाटणीस आले. जांबेचे क्षेत्रफळ हेरून ठेवणाऱ्या कुणालाही या उत्तराने बुजण्याचे कारण नव्हते. मारुतीच देऊळ पुरुषभर उंचीच्या चबुतऱ्यावर गावानजीक अगदी उघड्यावरच होते. त्यात रामदास एकदा न सापडण्यासारखे लपून बसल्याची कथा आहे ती आश्चर्यकारक आहे. ओढ्याच्या काठी जुनाट वटवृक्षाखाली रामजी-श्यामजीच्या समाधि शेजारी शेजारी आहेत. त्या वडावरून रामदासांनी जेथे उडी मारली











म्हणून सांगितले जाते तेथे डोह नाही. समारंभाच्या दिवसात तेथे घोटाभर पाणी वहात होते. रामदासांच्या बाल्यकाळानंतर तो डोह भरला अशी समजूत करून घ्यावी तर ओढ्याची रुंदी या समजुतीच्या आड येते. पंचवटी म्हणजे पाच वडांची जागा. ती जागा गावानजीकच्या लहानशा झाडीत होती. गावकऱ्यांनी दाखविलेल्या स्थळी पोहोचल्यावर पाहावे तर संख्येचा व झाडांचा मेळ नाही. त्या जागी जुनाट कडूलिंबाची तीन झाडे होती. गावकरी त्यांनाच पंचवटी या नावाने ओळखतात. हा अनुभव देवांच्या कानी घातला तेव्हा ' एवढ्यासाठीच तुम्ही तेथे जाऊ नये, असे मी बोललो होतो ! ' हा खुलासा ऐकावा लागला. जांबेच्या मुक्कामात आणखी एक दोन वेळा पंचवटीची पुनः चौकशी केली, परंतु वडाची पाच झाडे एकत्र आहेत व त्यांना पंचवटी म्हणतात अशी वस्तुस्थिति आसपासच्या भागात कुठेच आढळली नाही. सारांश समर्थांच्या चरित्राशी जोडलेल्या स्थळांचा असा चमत्कार अनुभवास आला.

### देवांचा नमस्कार

प्रतिमास्थापनेपूर्वी त्या प्रतिमेची गावातून मिरवणूक निघाली. ती संपून प्रतिमा मंदिरात आली तेव्हा तिच्यावर नानांनी तीर्थस्थानाहून आलेल्या पाण्याने अभिषेक केला व नंतर प्रतिमा उचलून पूर्वनियोजित जागी ठेवली. त्यावेळी देवांच्या श्रद्धाळू चित्ताला किती कृतार्थता व धन्यता वाटली असेल त्याची कल्पनाच करावी. स्वस्थानी विराजमान झालेल्या मूर्तीकडे त्यांनी टक लावून पाहाता पाहाता ' समर्थ ' अशी आरोळी ठोकून एकदम साष्टांग नमस्कार घातला. एकदोन मिनिटे गेली तरी देवांचे शरीर नमस्काराच्या स्थितीत निश्चेष्ट पडले होते. त्यामुळे आजूबाजूच्या कित्येकांना भलत्याच शंका येऊन त्यांची आरडाओरड व धावाधाव सुरू झाली, "डॉक्टरला बोलावा, पाणी डोक्यावर शिंपडा" वगैरे हाकाहाकीत पाणी प्रथम आणले जाऊन त्यांच्या डोक्यावर प्रयोग घडताच देवांनी नागाप्रमाणे डोके उचलून खणखणीत आवाजाने ' मला काही एक झालेले नाही; काळजी नको. मी अगदी खुशाल आहे ' असे बजावून पुनः डोके भुईवर ठेवले. आता कृतकृत्यतेचा गहिवर श्वासोच्छ्वासाच्या, सूक्ष्म शारीरिक हालचालीने त्याकडे पाहाणाराच्या प्रत्ययास येत होता. गहिवर पुष्कळांना संसर्गजन्य व्याधीप्रमाणे बाधतो. पाहाणारातले तीन चारजण फुसफुसू लागले होते. तीन चार मिनिटात देव उठून उभे राहिले व ठरलेले कार्यक्रम चालू झाले.

### मंदिर रामदासांचे नव्हे तर मारुतीचे !

३२४ वर्षांनी रामदासांना त्यांच्या जन्मघरी प्रतिमारूपाने परत आणल्याचे कर्तृत्व श्री. शं. श्री. ऊर्फ नानासाहेब देव वारंवार वर्णीत असले तरी ते मंदिर मारुतीचे ठरावे असा योग होता. मर्त्य मानवाची प्रतिमा तो सत्पुरुष होता म्हणून देवाच्या योग्यतेने मंदिरात स्थापन करायला वेदशास्त्राची संमति नाही, ही अडचण जांबेच्या कार्यात उद्भवली आणि ती प्रतिमा रामदासस्वरूपी मारुतीची अशा निर्णयाने त्या अडचणीचे निवारण करण्याची पाळी आली. अर्चेच्या अनुष्ठानाला प्रारंभ करताना जो संकल्प उच्चारला गेला तो "श्रीरामदासस्वरूपेण श्री मारुतेः स्थिरप्रतिष्ठां करिष्ये ' असा होता. मारुतीचे रामदासरूप हे जांबेस बहुधा प्रथमच अस्तित्वांत आले असावे. मारुतीची दासमारुति, वीर किंवा प्रताप मारुति अशी नावे आहेत, रूप मारुतीचे पण रामापुढे हात जोडून, मान वाकवून नम्रतेने उभा असलेला दासमारुति, रामामागे गदा उगारलेली आणि शेपूट उभारलेले, अशा थाटाचा वीर किंवा प्रताप मारुति. असे आविर्भाव निराळे असले तरी त्याचे मूळ ( वानराकार ) रूप बदलत नाही., फक्त जांबेच्या मंदिरात दाढी, जटा, लंगोटी, हातात माळ, पुच्छाचा अभाव या रूपाची मारुतिप्रतिमा जन्मली. देवांना मनातून हा प्रकार आवडणे शक्य नव्हते. तथापि रामदासांना मारुतीचा अवतार मानण्याची परंपरा आहे, इकडे लक्ष देऊन देवांनी समाधान मानले असेल. मंदिर रामदासांच नसून मारुतीचे, यावर टाकळीच्या मठाचे पहिले समर्थशिष्य उद्धवस्वामी यांना रामदासांच्या समाधीचे भवितव्य काय, या प्रश्नाने चिंता उत्पन्न केली तेव्हा समाधीची अनास्था टाळण्याकरिता ' भिमाचे प्रतिष्ठेसि तेथ घडावे ' – मारुतीची प्रतिष्ठापना समाधीच्या जागी व्हावी म्हणजे लोकांना त्याचा आधार वाटेल, असे मनोगत उद्धवांनी एका श्लोकात मांडले आहे. रामदासांच्या समाधीवर किंवा समाधीजवळ मारुतीचे देऊळ उभारण्याचा प्रसंग आला नाही. रामदासांच्या











जन्मस्थानी मात्र मारुतीची प्रतिमा देवांच्या उद्योगाने अवतरली. उद्धवस्वामींचे मनोगत जन्मस्थानी सफळ झाले, हे समाधान देवांच्या वाट्यास आले. देवांनी समर्थमंदिराच्या वृत्तान्तात उद्धवांच्या मनोगताने 'श्रीरामदासस्वरूपेण श्री मारुतेः' ह्या संकल्पाला प्रास्ताविकातच दुजोरा देऊन ठेवला आहे.

## किरकोळ मौजा

समारंभात अन्नपाण्याची व्यवस्था बरी असली तरी भोजनास बसण्याची जागा एका बाजूस चढ व दुसऱ्या बाजूस उतार अशी असल्याने भोजनभाऊंना काही हाल सोसावे लागले. पत्रावळी व द्रोण धड नसावे यात आश्चर्य नाही. पत्रावळीवर वाढलेल्या पदार्थांना कसे तरी सावरून ठेवता येत होते. द्रोणातले पातळ पदार्थ वाहायला लागत आणि चढावरील पंक्तीच्या द्रोणातून निघालेले प्रवाह चुकविण्याकरिता समोरच्या उतारावरील पंक्तीच्या भोजनकर्त्यांना पुष्कळदा उठावे लागे. ही उठबस झटकन् साधावी म्हणून बहुतेकजण उकिडवेच बसत. पहिल्यावेळी कित्येक भोजनमग्नांचे द्रोणांतल्या पदार्थांचा पराक्रम लक्षात न आल्याने धोत्रे भिजून बिघडली. कीर्तनाच्या मंडपात जमीन सपाट केलेली होती तेथील पाने ज्यांच्या वाटणीस यदृच्छया येतील, त्यांना हा त्रास झाला नाही. मंदिरासाठी आजूबाजूचे निवडुंग तोडले होते; व त्यांचे काटे नीट झाडलेले नसल्याने भोजनास बसतेवेळी खालची जमीन नीट न पाहिली गेल्याने बऱ्याच जणांना त्या काट्यांनी सतावले.

## ती पवित्र भूमि

कीर्तनाच्या मंडपात जे व्यासपीठ होते, त्यावर भोजनोत्तर बसलेला एकजण ३–४ वाजण्याच्या सुमारास वेड्यासारखा नाचू लागला. तेव्हा जोराचे वारे वाहात होते; आणि धूळ, काड्या, काटे त्या वाऱ्याने मंडपात शिरत होते. हा दिवस समर्थजन्माचा अर्थात् चैत्र शुक्ल नवमीचा होता. नाचणारा कशासाठी नाचतो याचा बोध त्यानेच देव चौकशीला आले तेव्हा करून दिला. तोवर धुळीचे कण, गवताच्या काड्या हाती धरण्याचा प्रयत्न करून 'धन्य झालो, पवित्र झालो, सारी पापे भस्म झाली' यासारखी वाक्ये तो मोठ्याने बडबडत होता. त्याच्या भोवती बरीच माणसे जमली. त्याचे डोके बिघडले असाच प्रत्येकाचा कयास होता. पंधरावीस मिनिटात देव आले, ह्यावेळी त्याचा नाच थांबला व धापा टाकीत तो म्हणालाः–" तुमच्याखेरीज माझी ही स्थिति जाणण्याची पात्रता कोणातच नाही. जोराचा वारा सुटून त्याने धूळ, गवताच्या काड्या, काटे मांडवात आणले. मला एकदम समर्थांचे बाळपण आठवले. दुसऱ्याचा आधार न घेता समर्थ या भागातून हिंडत फिरत असता ते देहधर्म (त्याने देहधर्माचे वाचक घरगुती शब्द वापरले) येथेच जवळपास उरकीत असतील. तीच ही त्यांच्या संसर्गाने व उत्सर्गाने पावन झालेली भूमी वाऱ्याने अंगावर येणाऱ्या धुळीला मी अशा पावन भूमीचा अंश समजलो व एकदम माझे भान हरपले. तुम्हीच नाही का एका घळीच्या संदर्भात लिहिलेले की त्या घळीबाहेरच्या पवित्र भूमीवर पडून लोळावे आणि पवित्र व्हावे. भूमीवर लोळण्याचे धैर्य नसल्यामुळे वायूने त्या भूमीचे कण उडवून आपल्या पुत्राच्या (रामदास हे मारुतीचा म्हणजे वातात्मजाचा अवतार) पावनत्वाचे काम बजावले. मग जो करंटा असेल तोच या प्रसंगी देहभान गमावणार नाही." देवांनी त्याच्या नाचाचा उद्देश ओळखला व काही न बोलता निघून गेले. इतरांनाही या नाचण्याच्या वेडाचा अर्थ आता उमगला. कोणी रागावले, कोणी हसले. देव गेल्यावर भूमिकणांच्या पवित्रतेने भान जाऊन नाचणाराचे नाटक संपले.

## समर्थांच्या रामाची उपेक्षा

रामनवमीच्या दिवसाची एक गोष्ट समर्थभक्तीच्या दृष्टीने नमूद करण्याजोगी आहे. जांबेस रामाचे एक देऊळ आहे. जेथे रामनवमीचा उत्सव चालू असता रामदास आपल्या घरात जन्मले तेच ते रामाचे देऊळ. एका भोजनप्रसंगी तूप संपले तर ज्या रिकाम्या घागरीतून जेवणारांना यथेच्छ तूप वाढण्याचा चमत्कार रामदासांनी दाखविला ती घागर त्याच देवळात ठेवलेली आहे. हे रामदासांच्या घराण्याचे देऊळ, त्याची रामदासस्वरूपी मारुतीची प्रतिमा स्थापण्याच्या समारंभाच्या वेळी काय स्थिति होती ! मारुतीच्या उपास्याचे हे देऊळ मोकळे होते. तेथे कीर्तन प्रवचन यातले कोणतेच कार्य चालू नव्हते. गाभाऱ्याबाहेर सावलीत कुत्री लोळत होती व एक दोन गाढवे हिंडत होती. रामदासांचा इहलोक सुटण्यापूर्वी शिष्यांनी

त्यांना चाफळास जाण्याचे सुचविले परंतु त्यानी तेथे जाण्याचे साफ नाकारले. रामाच्या मंदिराजवळ आपली समाधि निर्माण झाली तर लोक समाधीचा महिमा वाढवून रामाची उपेक्षा करतील, अशा रीतीने रामाची अवहेलना सुरू होईल म्हणून त्यानी चाफळला जाण्याची मसलत धुडकावली, अशा तात्पर्याची कथा रामदासांच्या जीविताख्यानात आहे. भक्ताची महती ईश्वराहून कमी, या रामदासांच्या हेतूची पायमल्ली जांबेच्या समारंभाने निदर्शनास आणली. देवांनी पहिल्यांदा जांबेस पाऊल टाकले तेव्हा तेथे जे पाहिले त्यात हे राममंदिर आहे, पण समर्थ मंदिराच्या वृत्तान्तात त्याला स्थान नाही. खरा भक्त हा शिरोधार्य, असे श्रीकृष्णाच्या तोंडून ज्ञानेश्वरांनी आपल्या गीतेच्या टीकेत वदविले आहे, परंतु रामाच्या दासाचा महिमा रामाहून जास्त मानण्याचा अधिकार दासाच्या भक्ताला असू शकतो की काय हा प्रश्न रामाच्या उपेक्षेने जांबेच्या सोहळ्यात सोडविला गेला.

## गोठ्यातली झोप

जांबेच्या पाटलाची घरठाणे बाहेरच्या यात्रेकरूंसाठी मालकांनी मोकळी केल्याचे देवांनी सोहळ्यापूर्वी वृत्तपत्रातून लोकांना कळविले होते. अशा एका घरठाणाचा मुक्कामाच्या पहिल्या रात्री जो अनुभव आला, त्यावरून घरठाण म्हणजे काय याचे ज्ञान होईल. खेड्यातून उन्हाळ्यात बहुधा गावकरी आपली गुरे मोकाट सोडतात. गुरे चोरीस जाण्याचे किंवा हिंस्र श्वापदाचे भय नसेल तर बहुधा गुरे गोठ्यात नसतातच ती गावाच्या आधाराने जवळपास रात्र काढतात. एका पाटलाचे घरठाण अशा रिकाम्या गोठ्यापैकी होते. पुण्याहून चार सहा लौकिकवंतांचा एक जमाव सोहळ्याच्या आधी दोन दिवस जांबेस येऊन पोचला व त्याच्या होऱ्यात नेमका तो गोठा आला. गोठ्याची जमीन उंचसखल असावी, हे ठरलेलेच आहे. ती सपाट नव्हती पण ती बरबर साफ होती. तिथे पथाऱ्या टाकून यात्रेकरू दिवसा इकडेतिकडे भटकले, मराठवाड्यातील ओळखीची माणसे भेटल्यास किंवा त्यांना भेटून काही वेळ गप्पात काढला. अशा रीतीने दिवस घालवून पोटपूजा आटपल्यावर ती मंडळी घरठाणात आली व झोपी गेली. गुरांनी ठाण सोडले तरी त्यांच्या देहाच्या आडसंधीस चिकटून रक्तशोषाने जगणारे बारीक प्राणी बरेचसे ठाणात राहिले होते. गुरे नाहीत म्हणून त्यांना उपासमार घडत होती. त्या प्राण्यांना गुरांऐवजी ही माणसे मिळाली, हे प्राणी कुणाच्या कानामागे तर कुणाच्या बगलेत याप्रमाणे जेथे जमेल तेथे घट्ट बिलगून त्यानी आपल्या उपवासाचे पारणे आरंभले. निजलेल्यांना हा प्रकार झोपेत समजला नाही. सकाळी उठून जेव्हा ते यात्रेकरू बाहेर आले तेव्हा गोचिड्यानी आपल्या शरीरावर ठिकठिकाणी वस्ती केल्याचे ध्यानात येऊन त्यांना बसल्या जागेवरून ओढण्याची क्रिया तेथे झोपणारानी पत्करली व ह्या प्राण्यांच्या रुधिरासक्तीतून ती माणसे सुटली. सुटका करून घेताना त्या ठाणाबद्दल शिव्याशाप पुटपुटत होते. कारण आपली स्थिति ज्याच्या कानी जाईल तो हसण्यावारी नेईल, दाद लागण्याची शक्यता नाही हे त्याना ठाऊक होते. गैरसोयी सोसून रहाणे हीच रामदासावरील श्रद्धेची कसोटी आहे, असे देवांचे ब्रीद वाक्य होते. व ते अंशतः खरेही होते. " समर्थांना पाहिले, आनंद आहे, या सुखापुढे कोणतीच गरसोय भासणे शक्य नव्हे, असे सर्वांनी म्हणावे. " या उताऱ्यात देवांचे अंतरंग दिसले.

## मसुरकरांचे पाणी

ज्या गोड व थंड पाण्याच्या विहिरीचा उल्लेख आरंभी केला आहे, त्या विहिरीत दशमीच्या दिवशी पाण्याचा थेंब उरला नव्हता. रहाटदेखील काठावर मोडून ठेवला होता. जांबेच्या औतीभौती पाण्याने भरलेल्या विहिरी पुष्कळ असल्या तरी पिण्याजोग्या पाण्याची तीच एक विहीर होती. ती कोरडी पडलेली व मांडवात तीन चार स्त्रिया पाण्याच्या चिंतेने बसलेल्या. रात्रीचा प्रारंभ होता. त्या स्त्रिया त्या दिवशी दुपारी जांबेपासून सहा सात मैलावर असलेल्या गोदावरीनदीच्या दर्शनास चालत गेल्या होत्या. जांबेस पोचल्यावर थोडेसे खाऊन पाणी पिऊन झोपी जावे. ही आकांक्षा विहीरीच्या खडखडाटाने बारगळून त्यांच्या निराशेला सीमा राहिली नव्हती. मांडवात कोणी आल्यास त्याला त्यानी आपली कहाणी केविलवाण्या मुद्रेने काकुळतीच्या स्वरात सांगावी; जांबेच्या परिसराशी अपरिचित असणारे त्यांची गरज कशी भागविणार ? पुनः वेळ रात्रीची; शेवटी एकजण त्यांना

पाणी आणून देणारा भेटला. ओढ्यापलीकडे मसूरचे विनायकबुवा पंधरावीस शिष्यानिशी छावणी ठोकून राहिले आहेत, व इतक्या जणासांठी पाण्याचा रात्रीपुरता पुरवठा त्यांच्या छावणी असला पाहिजे असा तर्क चालवून तो दोन मोठ्याल्या कासंड्या घेऊन त्या शिबिराकडे निघाला. विनायकबुवा एखाद्या संस्थानिकाप्रमाणे शिबिराभोवती चौफेर आपल्या जटाळू दंडधारी शिष्यांचा पहारा ठेवून शिबिराच्या मध्यभागी बंदोबस्ताने राहणारे बुवा होते. तो इसम शिबिराच्या हद्दीशी पोचताच दोन तीन दंडधारी शिष्य धावून त्याच्या समोर 'तुम्ही कोण ? कुणाला भेटायचे आहे ? तुम्ही वाट चुकून भलतीकडेच आलासे वाटते ?' वगैरे शब्द मगरुरीच्या आवाजाने विचारीत येऊन थांबले. थांबले म्हणजे त्यांची धाव मंदावली, परंतु ते प्रश्न विचारता विचारता त्या जलार्थ्याच्या अंगाशी भिडले. तो इसम डगमगला नाही. 'येथे विनायकमहाराज आहेत ना ? त्यांची ओळख असून त्यांना भटायचे आहे' असे म्हणत तो पुढे सरकला. उभयपक्षी या वेळीं आवाज चढून रेटारेटीपर्यंत मजल गेली होती. हकीकतीत विनायकबुवा आणि विनायकमहाराज हे गौडबंगाल उकलण्यासाठी सांगणे अवश्य आहे की, बुवाऐवजी महाराज हा शब्द लावण्याची बुवांना हौस होती. गोव्याकडील शुद्धिव्यवहारात बुवांचे आणि गोवेकरांचे बिनसल्यावर बुवा मुंबईस आले. त्यानी प्रवचने आरंभली. त्यांची बातमी वृत्तपत्रातून 'बुवा' या उपाधीने प्रसिद्ध झाल्यास त्यांचे शिष्यबुवा छापणाऱ्या संपादकाला भेटून 'महाराज' छापीत जा असे सांगायला जात होते. हे लक्षात घेऊन जटाळू दंडेवाल्याची दंडेली मऊ पडण्यासाठी 'विनायकमहाराज' या शब्दाचा प्रयोग जांबेस केला गेला. त्याचा परिणाम दिसण्याच्या आत बुवांचे तत्कालीन कारभारी क्षीरसागर तेथे आले. (या क्षीरसागरांना पुढे बुवांच्या गोटातून बाहेर पडल्यावर बुवांच्या शिष्यानी उत्पन्न केलेल्या प्राणघातक प्रसंगात सापडण्याची पाळी आली होती) त्यानी कासंड्या घेऊन आलेल्या इसमास ओळखून चौकशी केली. मांडवात काही स्त्रिया पाण्यासाठी तळमळत आहेत, येथे पाण्याचा साठा असेल हे कारण ऐकून त्या कासंड्या भरून पाणी मांडवात पोचविण्याची कामगिरी क्षीरसागरानी दंडधराकडे सोपविली व आलेल्या इसमाने महाराजांच्या दर्शनाची इच्छा दर्शविल्याने क्षीरसागर त्या दर्शनेच्छूला आपल्या गुरूकडे घेऊन गेले. बुवा एका स्वतंत्र झोपडीत बसले होते. प्रास्ताविक परस्पर नमोनमोचा विधि आटोपल्यावर बुवांनी दाखविलेल्या जागी बैठक मारून अभ्यागताने सुरवातीस त्याना जांबेस जाण्यासाठी पोलिसांची परवानगी मिळाल्याबद्दल अभिनंदन केले. बुवा त्या दिवसात सरकारी रोषाच्या फेऱ्यात सापडून पोलिसठाण्यावर हजेरी लावण्याची जबाबदारी त्यांच्यावर पडली होती "आपले धर्माचे काम. राजकारण हा आपल्या कार्याचा भाग नाही. यामुळे पोलिसकचेरीत हजरीस जाण्याचा खेद नसावा. त्यात अपमान तरी कसला ?" वगैरे अभ्यागताचे विचार ऐकून बुवांनाही बरे वाटले असावे, कारण त्यानी अधिकोउत्तराची वाट न पाहता क्षीरसागरांना केळी दूध आणण्यासाठी फर्मावले. त्या खाद्यपेयांचा समाचार घेत घेत अभ्यागताने चालविलेला संवाद बुवांची तब्बेत खूष करणाराच होता. बुवांचा निरोप घेऊन परत मांडवाकडे जातांना बुवांनी आणखी एक पाण्याने भरलेले भांडे बरोबर दिले. तिकडे मांडवात त्या तहानभूक भागलेल्या स्त्रिया पाण्याची तजवीज करणाराची कृतज्ञतापूर्वक प्रतीक्षा करीत होत्या. स्त्रियांतल्या वृद्धेने 'बाळ, तुझ्यासाठी दोन जिन्नस फराळाचे ठेवले आहेत. तूं ते खावेस अशी आमची इच्छा आहे. तू जर न भेटतास तर आमचे हाल झाले असते, संकोच करू नको' तिकडे दूध केळी मिळाली तर इकडे शिंगाड्याच्या पिठाचा लाडू मिळाला – हा प्रसंग मसूरच्या विनायकबुवांची किंचित ओळख करून द्यावी, जांबेची व्यवस्था आकलन व्हावी, यासाठी येथे सादर केला आहे.

## देवांचा शोचनीय अंत

या सोहळयात केव्हा केव्हा ज्याला जिज्ञासा व सवड असेल ते रामदासांचे राजकारण, शिवसमर्थभेटीचे वर्ष, या विषयांचा खल करीत असत, तथापि त्याला अटीतटीचे स्वरूप आले नाही. सोहळा संपला. लोकांच्या उत्सवप्रियतेने तो गाजण्यासारखा साजरा केला. मराठवाड्यातील हिंदु जनता धार्मिक दृष्टीने निजामशाहीखाली दबलेली होती. हिंदूंच्या उत्सवाला अगदी निर्विघ्न मोकळेपणा असा त्यावेळीच मिळा-










त्याने त्या भागातील लोकांची गर्दी अधिक असणे स्वाभाविक समजावे लागते. त्या सोहळयावरून देवांनी फार मोठ्या आकांक्षा आपल्या वृत्तान्तात व्यक्त केल्या आहेत. परंतु त्या आकांक्षा आचरणात उतराव्या अशी अनुकूलता जांब गावात नाही. दरवर्षी मार्गशीर्षात समर्थभक्तांनी जांबेस जमावे, हा देवांचा उद्देश त्यांच्या हयातीतच सफल न होण्याची लक्षणे प्रतिवर्षी वाढत होती. त्यांनी योजलेल्या व्यवस्थेत पुढे घोटाळे उत्पन्न झाले. त्याचा इतिहास निवेदन करण्याची आवश्यकता नाही. देवांच्या समर्थभक्तीपुरता विचार केल्यास ते कृतार्थ झाले असे म्हणता येईल. त्यांनी महाराष्ट्रात उत्पन्न केलेल्या समर्थविषयक जागृतीनेच सज्जनगडावरील समर्थसंबंधाच्या स्थळांचा जीर्णोद्धार घडला. शेवटी समाधिस्थळाने जन्मस्थळावर मात केली असाच निकाल निघतो. देवांनी समर्थांचे ग्रंथ जमविले, छापले, लोकांना त्यांतील उपदेश सांगितला, हे सर्व त्यांच्या ज्येष्ठ चिरंजीवांच्या अकालनिधनापर्यंत ठीक चालले होते. तो मुलगा देवांच्या कामाला हातभार लावीत होता. तो गेला आणि देवांच्या बुद्धीचे बळ खालावत चालले. पुढे स्मरण आटपले. आबा वारल्यावर पाठविलेल्या सांत्वनपरपत्राच्या उत्तरात देवांनी रामदासांचा एक धैर्योत्पादक श्लोक लिहून जो भाव व्यक्त केला तो पत्रापुरताच होता. तो टिकला नाही. आपल्या हयातीत पन्नास वर्ष वयाच्या पुत्राचा मृत्यु. हा प्रसंग असह्य दुःख देणारा हे कोणीही सहज कबूल करील. परंतु त्या दुःखाचे दमन करण्याऐवजी त्याच्या पायी स्वतःचा घात होऊ द्यावा, हे मनुष्यस्वभावातील प्रापंचिक ममत्वाच्या प्रभावाकडे लक्ष दिल्यास समर्थनीय मानले तरी ज्याने सारा जन्म समर्थाच्या सेवेत आणि त्यांच्या शिकवणीचे चिंतन मनन करण्यात घालविला त्याच्या संबंधात थोडे अनुचित वाटते.

देवांनी जांबेस रामदासांचे मंदिर बांधले, त्यापेक्षा ज्याला मोल नाही, असे त्यांचे काम धुळे येथील श्रीसमर्थवाग्देवतामंदिराचे आहे. त्या मंदिराचा उद्घाटन समारंभ १९३५ मध्ये जांबेच्या थाटाने झाला. त्या समारंभाचा प्रसंग मनोरंजक आहे.










श्री. सेतु माधवराव पगडी

# पुरंदरची मोहीम : राजा जयसिंग याची पत्रे (उत्तरार्ध)

(७)

विनंति की मी सासवडला पोहोचणार असल्याची हकीकत यापूर्वी आपल्याला कळविली आहे. मी घाटाची वाट नीट करविली. रमजान महिन्याच्या बावीस तारखेस गुरुवारी (एकोणतीस मार्च १६६५) मी तोफा, रेहकले आणि अघाडीचे सैन्य दिलेरखाना-बरोबर पुढे रवाना केले. त्यानी दोन कोस पुढे जाऊन घाट चढून मुक्काम करावा असे मी त्याला सांगितले. रमजान महिन्याच्या तेवीस तारखेस शुक्रवारी (तीस मार्च १६६५) मी पण पुढे निघालो. दाऊदखान यास मी घाटाच्या पायथ्यापाशी सोडले. दुपारपर्यंत त्याने सैन्य घाटावर सुरक्षितपणे आणावे अशी मी सूचना दिली. जे काही उरतील त्याना चंदावल-(पिछाडी) च्या पथकांनी आणावे असे ठरले. मध्यान्हीच्या सुमारास मी घाटमाथ्यावर दोन कोसावर कायम केलेल्या छावणीत पोहोचलो.

त्याच दिवशी म्हणजे शुक्रवारी सकाळी दिलेरखान हा अघाडीची पथके बरोबर घेऊन पुढे निघाला होता. 'माझ्या छावणीसाठी एखादी जागा निवड' असे मी त्याला सांगितले होते. योग्य जागा शोधून काढ-ण्याच्या प्रयत्नात तो पुरंदरच्या किल्ल्याजवळ पोहोचला. किल्ल्याच्या वाटेवर शत्रूंच्या चौक्या होत्या, त्यांना इकडे लोक 'माची' असे म्हणतात. या चौक्या डोंगराच्या चढणीवर पसरल्या होत्या. शत्रूचे सैनिक डोंगरावरून खाली उतरले. त्यांच्या हातात बंदुकी होत्या. त्यांनी आमच्या पथकावर हल्ला केला. पण मोगलांनी त्याना हटविले. आणि त्यांचा पाठलाग करून माची हस्तगत केली. शत्रूपैकी काही मारले गेले. बाकीचे पळून गेले. पुरंदर किल्ला कधी मोगलांच्या ताब्यात आला नव्हता. किल्ल्याची माची आम्ही अशा रीतीने हस्तगत केली याला कारण परमेश्वराची कृपा आणि बादशहाचे भाग्य हेच होय !

दिलेरखानाकडून ही बातमी कळली त्यावेळी राय-सिंग राठोड, कीरतसिंग, इत्यादि माझ्या छावणीत होते. मी त्यांच्या बरोबर तीन हजार सैन्य देऊन त्यांना ताबडतोब दिलेरखानाकडे रवाना केले. दाऊद-खान यास मी आज्ञा केली की छावणीचे मी पाहून घेईन. तू पुढे जाऊन किल्ल्याची टेहेळणी कर आणि याबद्दल जे काही आवश्यक असेल ते अमलात आण. दाऊदखान हा घाटाच्या पायथ्याशी होता. त्याला ही बातमी कळली. तो अनुभवी आणि जाणकार आहे. माझ्याकडे येऊन पुढे जाण्यात दिरंगाई होण्याचा संभव आहे हे ओळखून तो सरळ पुरंदरच्या किल्ल्या-कडे रवाना झाला.

तोपर्यंत संध्याकाळ झाली. छावणीत माझ्याशिवाय कोणीच नव्हते. रात्री पुढे कूच करण्यात अडचणी होत्या म्हणून मी तेथेच मुक्काम केला.

दुसऱ्या दिवशी म्हणजे रमजान महिन्याच्या चोवीस तारखेस (एकतीस मार्च १६६५) शनिवारी मी पुढे रवाना झालो. सैन्य सुरक्षित असावे याची मी खबरदारी घेतली. पुरंदर आणि सासवड या दोन्ही स्थळांच्या मध्यभागी मी मुक्काम केला. दोहोमधील अंतर दोन कोसापेक्षा अधिक नाही. त्या ठिकाणी पोहोचताच मी प्रथम दाऊदखान आणि कीरतसिंग हे ज्या ठिकाणी तळ करून होते तेथे पोहोचलो. तेथून मी किल्ल्याची पाहणी केली. किल्ला मजबूत आहे. शिवाजीच्या किल्ल्यांपैकी इतका बळकट असा दुसरा किल्ला नाही. हा पूर्वी निजामशाहीत होता तो आता शिवाजीच्या ताब्यात आहे. वेढा घालून जाण्या-येण्याच्या वाटा बंद केल्याशिवाय किल्ला हाती येणे शक्य नाही. या किल्ल्याने सगळा डोंगरच व्यापला आहे असे म्हणता येईल. किल्ला मजबूत करण्यात आलेला आहे. शिवाजीचे राजगड आणि



अनुक्रमणिका






इतर किल्ले हे येथून जवळ आहेत. किल्ल्यावर त्याने सैन्य जमविले आहे. आदिलखानाचा आणि शिवाजीचा एकोपा झाला. या गोष्टी घडल्या, पण त्यांच्याकडे दुर्लक्ष करून चालणार नाही. किल्ला न घेणे हे केव्हाही योग्य होणार नाही.

या गोष्टीचा मी पुष्कळ विचार केला. शेवटी मी असे ठरविले की रुद्रमाळ जिंकून घ्यावा. पुरंदर किल्ल्याचा हा एक प्रमुख भाग असला तरी पुरंदर-पासून वेगळा असा हा किल्लाच म्हणता येईल. हर प्रयत्नाने रुद्रमाळ ताब्यात आणण्याचे मी ठरविले. पावसाळा एक महिन्याने सुरू होईल. आपल्याला जास्त अवधि नाही. परमेश्वराच्या कृपेने आणि बादशहाच्या भाग्याने रुद्रमाळ हाती येईल अशी आशा आहे. त्यामुळे शिवाजीचा सर्वात मजबूत असलेला पुरंदरचा किल्ला आमच्या ताब्यात येऊ शकेल. पावसाळ्याच्या पूर्वी पुरंदर आमच्या ताब्यात आला नाही तरी आम्ही रुद्रमाळ येथे मजबूत ठाणे कायम करू. आणि पावसाळ्यानंतर पुढील योजनेचा विचार करू.

## (८)

विनंति की रुद्रमाळचा किल्ला म्हणजे पुरंदरची किल्ली, रुद्रमाळ म्हणजे पुरंदरचा रक्षक किल्ला. शिवाजीचा मोड करण्याच्या कामातील आमचे हे प्रथम आणि महत्त्वाचे कार्य होय. शव्वाल महिन्याच्या आठ तारखेस (चवदा एप्रिल १६६५) शुक्रवारी रुद्रमाळ आमच्या ताब्यात आला. त्याची तपशीलवार हकीकत अशी :

आम्ही किल्ल्याला वेढा घातला हे आपल्याला पूर्वी कळविलेच आहे. यानंतर आम्ही अवघड अशा डोंगराच्या माथ्यावर तोफा चढवू लागलो. तोफा ओढ-ण्याच्या कामावर मी आपली सगळी शागीर्दपेशा माणसे लावली. प्रथम आम्ही अब्दुल्लाखान नावाची तोफ रुद्रमाळच्या समोर असलेल्या डोंगरावर चढविली. या कामात आम्हाला तीन दिवस लागले. यानंतर पुढील साडेतीन दिवसात आम्ही फत्ते लष्कर नावाची तोफ चढविली. तिसरी तोफ हहेली ही पण जवळ जवळ वर डोंगरावर पोहोंचविण्यात आली होती. या अवधीत आमच्याकडून रुद्रमाळ किल्ल्यावर तोफांचा सारखा भडिमार चालू होता. किल्ल्याच्या बुरुजाचा पाया डळ-मळू लागला. आमचे बेलदार हे बुरुजाच्या पायथ्याशी जाऊन खणू लागले (सुरुंगासाठी).

शव्वाल महिन्याच्या सात तारखेस (तेरा एप्रिल-१६६५) गुरुवारी मध्यान्हापर्यंत दिलेरखान याने आपली माणसे आणि इतर सैनिक यांना बुरुजावर चढविले. चढण इतकी अवघड होती की एका वेळी दोनच माणसे, आणि तीही कष्टाने, बुरुजापर्यंत जाऊ शकत. पण दिलेरखानाच्या माणसांनी खूप परिश्रम करून बुरुजावर ताबा मिळविला. शत्रूपैकी काहीजण मारले गेले आणि काही जखमी झाले. शत्रूचे सैनिक निराश झाले. आमचे सैन्य रुद्रमाळाच्या आतील कोटाच्या वेशीवर पोहोचले आणि किल्ला घेण्याच्या तज-विजीस लागले. पण किल्ल्यातील शिबंदी शरण आली. त्यांनी अभयाची याचना केली. शरणगताना मारणे ही आपली पद्धत नाही म्हणून किल्ल्यातील लोकांना अभय देण्यात आले. शव्वाल महिन्याच्या आठ तारखेस (चवदा एप्रिल १६६५) शुक्रवारी किल्ल्यातील लोकांनी किल्ला आमच्या ताब्यात दिला. नंतर ते किल्ल्यातून बाहेर निघाले. त्यानी माझी गाठ घेतली. आपल्याला शिवाजीकडे जाऊ द्यावे अशी त्यानी विनंति केली. वास्तविक पाहता त्यांना सोडून देणे योग्य नव्हते. पण पुरंदर किल्ल्यातील लोकांना (आपल्यालाही पुढे मागे अभय मिळेल अशी) आशा वाटत असल्यास त्यांचा भंग होऊ नये या धोरणाने मी त्यांचे समाधान करून त्यांना निरोप दिला.

दिलेरखान आणि त्याचे सहकारी यांनी उत्कृष्ट, कामगिरी केली याबद्दल त्यांना धन्यवाद ! खरे म्हणजे हे बादशहाच्या भाग्याने घडले. शत्रूने आपली स्वतःची झालेली दुर्दशा या पूर्वी अनुभविली नव्हती. परमेश्वर कृपेने त्यांना या पेक्षाही वाईट दिवस पाहावे लागतील. शिवाजीला चांगलाच धडा मिळाला आहे.

बादशहा सलामत, येथे पावसाळ्यात छावणी करून राहावे लागेल. दुसरे काही काम राहाणार नाही. म्हणून मी असे ठरविले आहे की पुरंदरला वेढा घालावा आणि तो जिंकून घेण्याचा प्रयत्न करावा. परमेश्वर कृपा करील तर पावसाळा सुरू होण्यापूर्वी किंवा ते न जमल्यास ऐन पावसाळ्यात मी पुरंदरचा

किल्ला जिंकून घेईन. सगळे सैन्य या कामासाठी एकत्र झाले असून माझ्या म्हणण्यासारखे काम करून दाखवील याची आपण खात्री बाळगावी. पावसाळ्यात हा किल्ला सर झाला तर आम्ही सगळे मोगल सरदार शिवाजीचा संपूर्ण मोड करण्याच्या मागे लागू. नाहीतर दिलेरखान हा किल्ल्याच्या समोर बसून राहील. किल्ला घेतल्याशिवाय तो येथून हलणार नाही. दाऊदखान, राजा रायसिंग आणि इतर सरदार, हे शत्रूचा प्रदेश उध्वस्त करण्याच्या कामावर नेमले आहेत. मी त्यांच्याबरोबर ठिकठिकाणी फिरत राहीन.

बादशहा सलामत, माझा बेत असा होता की ठिकठिकाणच्या ठाण्यावरची पथके इकडे बोलावून घ्यावी. लष्करच्या काहीचे (रसद आणणे, शत्रूची माहिती काढणे वगैरे) काम या पथकांना द्यावे; आणि दाऊदखानाच्या नेतृत्वाखाली सैन्य तयार करून त्याला रायगडाकडे पाठवावे म्हणजे शत्रू गडबडून जाईल.

सरफराजखान हा लष्करात आला नाही. तो आपल्या जागेवरून तमाशा पाहात बसला आहे. दुसऱ्यांना धडा मिळावा म्हणून मी त्याची मनसब एक हजाराने आणि एक हजार स्वाराने कमी केली आहे. त्याच्या तनखा जागिरीचा वरीलपुरता भाग जप्त करून खालसा करावा अशा अर्थाची आज्ञा आपण सुभ्याच्या अधिकाऱ्यांना पाठवाल अशी आशा करतो.

ठाण्यावरची पथके इकडे येऊन दाखल झाल्यानंतर, मी सन्ये (राजगडाकडे) पाठविण्याची योजना अमलात आणीन.

बादशहा सलामत, या पूर्वी तोफांचा उपयोग केवळ भुईकोट किल्ल्याविरुद्ध करता येतो असा समज होता. पण या मोहिमेत एक गोष्ट दिसून आली. डोंगरी किल्ल्यावर हल्ला करण्यासाठी तोफांना डोंगराच्या कमरेपर्यंत (मध्यापर्यंत) तोफा चढविता येणे शक्य आहे. या भागाला इकडे माची म्हणतात. त्या भागावरून किल्ल्यावर परिणामकारक असा मारा करता येतो. रुद्रमाळच्या वेढ्यात आम्ही असेच केले.

या मोहिमेत आम्हाला प्रामुख्याने शिवाजीच्या डोंगरी किल्ल्यावरच हल्ले करणे आहे. आणि एखादाच किल्ला आहे असे नाही. म्हणून विनंति की मरहूम-खानखानान यांच्या तोफा आपल्याजवळ आहेत त्यापैकी दोन तीन मोठ्या तोफा मला देण्यात येतील तर फार कृपा होईल. दौलताबाद आणि बुऱ्हाणपूर येथील अधिकाऱ्यांना आपण आज्ञा करावी की तेथे नव्याने तयार झालेल्या तोफा आहेत त्या माझ्याकडे पाठवाव्या. वाजवी होते ते लिहिले आहे.

(९)

आपण पाठविलेले पत्र व राज्यारोहण दिनाचा खिलतीचा पोशाक ही शव्वाल महिन्याच्या वीस तारखेस (सव्वीस एप्रिल १६६५) मिळाली. मी आपल्याला कळविलेल्या योजना आणि मांडलेल्या सूचना आपण मान्य केल्या हे मी माझे भाग्य समजतो.

चौलचे बंदर आणि तळकोकणचे इतर भाग मी जिंकून घ्यावे अशी आपण आज्ञा केली होती. पण इकडील परिस्थितीबद्दल मी अनेक पत्रातून आपल्याला कल्पना दिली होती. शिवाजी आणि आदिलशहा यांची दुर्दशा करावी या विचाराने आणि हीच मसलत योग्य असे समजून, मी प्रथम सासवडकडे आलो. त्यानंतर पुरंदरच्या किल्ल्याला वेढा घालावा लागला. दिलेरखान हा इतर मोगल अधिकाऱ्यांना (त्यांची यादी सोबत दिली आहे) बरोबर घेऊन पुरंदरच्यासमोर तळ देऊन बसला आहे. मला चहूकडे फिरावे लागते, आणि शत्रूचा तपास काढावा लागतो.

अशा परिस्थितीत चौलचे बंदर आणि तिकडील प्रदेश जिंकून घेण्याचा बेत करावयाचा तर त्याकरिता सुसज्ज असे वेगळे सैन्य तयार करावे लागेल. हे सैन्य स्वयंपूर्ण हवे. इतर सैन्याच्या मदतीची त्यास गरज पडू नये. या सैन्याला त्याठिकाणी उत्तम रीतीने ठाण मांडून बसणे जमले पाहिजे. अशाच प्रकारचे सैन्य पाठवावे लागेल. यावेळी हे कठीण आहे. बरे, असे सैन्य पाठविले तरी या पावसाळ्यात इतक्या लांब अंतरावर सैन्याला रसद पाठविणे हेही कठीणच!

दाऊदखानाला आपले सैन्य घेऊन प्रदेश उध्वस्त करण्याच्या कामावर मी नेमल आहे. ते तो पार पाडीत आहे. मी ही मोहीम पुढच्या वर्षावर ढकलीत नाही. पावसाळा संपताच मी शिवाजीचा मोड करण्याच्या मागे लागेन. या अवधीत (आम्ही काही करीत नाही असे समजून) शिवाजी निश्चिंत होऊन गाफील राहील. या अवधीत गुजरातेच्या बंदरातून आपली












जहाजे आणि गराबा ही निघून शिवाजीच्या प्रदेशावर (समुद्रकिनाऱ्याच्या) चाल करून जातील तर त्याची पुष्कळ संपत्ति आपल्या हाती पडेल.

(आदिलशाही) तळकोकण या प्रदेशासंबंधी मी आदिलखान (आदिलशहा) याचा वकील मुल्ला खुर्रम याजबरोबर बोलणी केली होती. त्याने आदिलखानाला सर्व हकीकत लिहून पाठविली. आदिलखानाने आपल्या उत्तरात पुढीलप्रमाणे लिहिले आहे:

"मी आपला एकनिष्ठ सेवक आहे. मी कायेने, वाचेने आणि मनाने शिवाजीच्या विरुद्ध आहे." माझ्याकडून आपल्याला जी पेशकश (खंडणी) भरावी लागते त्यातील बराचसा भाग आपण माफ केला तर त्या रकमेतून मी सैन्य सरंजाम तयार करून तळकोकणचा प्रांत (शिवाजीकडून) जिंकून घेण्यासाठी सैन्य रवाना करीन.

दुसरे असे की कराराप्रमाणे शिरवळचे ठाणे माझ्या हद्दीत आहे. तेथे मोंगल लष्कर पाठविण्याची जरूर नाही. माझे लष्कर तेथे राहील. या गोष्टीला आपण मान्यता द्यावी."

याच्या उत्तरात मी म्हटले की तुमच्या बोलण्यात आणि वागण्यात तफावत आहे. तळकोकण घेण्याशी याचा काय संबंध आहे? तळकोकण कोठे आणि पाईन घाट कोठे! तुम्ही बादशहाचे एकनिष्ठ सेवक राहून त्यांची कृपा संपादन केलीत तर तुमचे राज्य सुरक्षित राहील. तुम्ही आपल्या सैन्याचा विचारच करू नये. आमच्या सैन्याच्या मानाने तुमचे सैन्य काय करू शकेल?

आपल्याला खंडणीत सूट मिळाल्यास आम्ही तळकोकण घेऊ असे तुम्ही म्हणता हे तुमचे म्हणणे कितपत योग्य आहे? आणि या रकमेच्या खर्चाने तुम्ही तळकोकण कसे घेऊ शकाल? तुमचा मुलुख तुम्हाला देण्यात आला तर ती बादशहाची कृपा म्हणून समजा. नाहीतर आज जो काही मुलुख शिवाजीच्या ताब्यात आहे आणि पुढे राहील तो बादशाही मुलूखच समजला जाईल. परमेश्वरकृपेने आणि बादशहाच्या भाग्याने तो आमच्या ताब्यात येऊन बादशाही मुलुख बनेल. तो आमच्या ताब्यात आल्यानंतर तुमच्या विनंतीचा विचार करण्यात येईल.

शिरवळसंबंधी तुमची विनंति अयोग्य आणि अप्रस्तुत आहे. माझा शिवाजीशी बिघाड झाला आहे असे आज तुम्ही म्हणता, याचा स्पष्ट अर्थ असा की आतापर्यंत तुमच्यात आणि त्याच्यात एकोपा होता. म्हणजे तुम्ही बादशहाबरोबर विरोध पत्करला. अशा परिस्थितीत बादशहाबरोबर झालेले करार कायम राहाणार नाहीत. तुम्हाला योग्य हेच की तुम्ही वाईट विचार मनातून काढून टाकून बादशहाशी निष्ठेने वागा. अद्याप बादशहांनी तुम्हाला शिक्षा केली नाही. तुम्ही असे न वागाल तर तुमचा परिणाम काय होईल हे कुणाही विचारवंताला समजू शकेल.

बादशहा सलामत, खरे पाहिले तर आदिलखान (आदिलशहा) आणि शिवाजी यांचा एकोपा आहे ही गोष्ट विशेष महत्त्वाची नाही. पण आपली सैन्ये इतर मोहिमात गुंतली आहेत. यामुळे विजापूरकरांशी एकदम कडक धोरण स्वीकारणे योग्य नव्हे असे मला वाटले. तसेच त्यांना निराश करणेही बरे नाही असे मी ठरविले. म्हणून मी मुल्लाखुर्रम यास येथेच ठेविले. आपल्यातर्फे आपले सेवक इब्राहीम, आणि गोविंद पंडित आणि माझा एक ब्राह्मण नोकर यांना मी आदिलखानाकडे (आदिलशाह) पाठविले. त्याला मी तपशीलवार पत्र लिहिले आहे. त्या पत्राची एक प्रत मी आपल्याकडे पाठवीत आहे.

गोवळकोंड्याचा कुतुबुल्मुल्क (कुतुबशहा) याने एका विश्वासू ब्राह्मण मुत्सद्याबरोबर एक पत्र आणि जडजवाहीर ही पाठविली आहेत. ही रत्ने आपल्या लायकीची नाहीत. पण त्याचे कौतुक (कुतुबशहाचे) म्हणून ते जडजवाहीर मी आपल्याकडे पाठवीत आहे.

कर्नाटकाच्या जमीनदारांकडे मी माणसे पाठविली होती. शिवाप्पा नाईक (बिदनूर), आणि बसवापट्टणचा जमीनदार यांनी बादशहाबद्दल आपली निष्ठा व्यक्त केली आहे. मी त्यांना समाधानाची पत्रे आणि भेटीदाखल वस्त्रे पाठविली आहेत. यानंतर जे काही ठरेल ते आपल्याला मी लिहून कळवीन.

विजापूराहून बातमी आली आहे की बहलोल हा नरकात गेला आहे. हे सगळे बादशहाच्या भाग्याने घडले आहे.

माझ्या म्हणण्याप्रमाणे आपण मुख्त्यारखान आणि इस्माईलखान यांच्या नावे हुकूम पाठविले हा माझा

मान आहे असे मी समजतो. सैन्यासंबंधीचे सगळे अधिकार आपण मला दिलेत हे मी आपले मोठे भाग्यच समजतो. नायब्रशफीखान हा दप्तर येथे घेऊन आल्यानंतर मी आपल्याला प्रत्येक प्रकरणाबद्दल लिहीन आणि आपल्या आज्ञेप्रमाणे वागेन. शहाजाद्यांना (मुअज्जम) पण मी सगळी हकीकत लिहून कळवीन. कामे चांगली पार पाडावीत यापरता माझा अन्य हेतु नाही. परमेश्वर कृपेने आणि आपल्या भाग्याने मी शिवाजीचा लवकरच नायनाट करीन. येथलि प्रकरणे आपल्या इच्छेप्रमाणे पार पडतील.

बादशहासलामत, राजगड हे शिवाजीचे मुख्य ठिकाण आहे. त्या भागात मी सुसज्ज अशी सैन्ये पाठविली आहेत. असे करण्याची कारणे म्हणजे पुढील प्रमाणे होत :

पहिले कारण म्हणजे आदिलखान (आदिलशहा) आणि शिवाजी यांना दाखवून द्यावयाचे होते की आमचे सगळे सैन्य एकच किल्ल्याच्या वेढ्यात गुंतून राहिले नाही. इतर मोहिमासाठीपण आमची सैन्ये सुसज्ज आहेत.

दुसरे कारण असे की आतापर्यंत शिवाजीचे सैन्य बादशाही मुलुखात घुसून उच्छाद मांडीत असे. आता आमची सैन्ये त्याच्या प्रदेशात घुसून तो प्रांत उध्वस्त करतील हे त्याला दाखवून द्यावयाचे आहे. तो किंवा त्याची सैन्ये पुन्हा तयार होऊन येण्याची संधीच देण्यात येणार नाही. त्याचा प्रदेश उध्वस्त करावा इकडे माझे सतत लक्ष राहील.

वरील कारणामुळे मी दाऊदखान, राजा रायसिंग सठोड, आणि इतर सरदार यांच्याबरोबर सहा हजारापेक्षा अधिक सैन्य देऊन, राजगड, रोहिडा आणि कोंडाणा या भागात त्यांना तैनात केले आहे. त्यांना मी आज्ञा केली आहे की तो प्रांत पूर्णपणे निर्जन आणि बेचिराख करून टाकावा. आणि शत्रूचे सैनिक युद्धास प्रवृत्त होऊन चालून आले तर त्यांचा निःपात करावा. शिवाजीची ठाणी उध्वस्त करावी आणि त्याच्या प्रांतात उच्छाद मांडून तेथील मालमत्ता लुटावी अशा अर्थाची पत्रे मी लोधीखान आणि कुतुबुद्दीनखान याना पाठविली आहेत. हेतु हा की चहूकडून धामधूम उडवून शिवाजीच्या सैन्याची पांगापांग होईल असे करावे. बालाघाट (घाटावरचा) आणि पाईनघाट (घाटाच्या पायथ्याशी) या प्रांतात आम्ही अल्पावधीत विलक्षण धामधूम उडवून देऊ अशी मला आशा वाटते. तळकोकणचा मनसुबा परमेश्वर करील तर, पुढील वर्षी उत्तम तऱ्हेने तडीस जाईल. आवश्यक वाटले ते लिहिले आहे.

(१०)

विनंति की आपले पत्र जिल्काद महिन्याच्या पहिल्या तारखेस (सहा मे १६६५) मिळाले. आपण लिहिले आहे की तुमच्या मुत्सद्दीगिरीवर माझा पूर्ण विश्वास आहे. शिवाजीचा संपूर्ण नायनाट करण्यासाठी तुम्हाला जे काही योग्य वाटेल ते करा. यावर विनंति की माझ्यामध्ये शहाणपणाचे आणि धोरणीपणाचे गुण आहेत. ते सर्व मी आपल्या तालमीत वाढल्यामुळे प्राप्त झाले आहेत. ज्या कामावर माझी नेमणूक झाली आहे त्याचाच मला रात्रंदिवस ध्यास लागला आहे. त्या शिवाय दुसरा विचार नाही. परमेश्वराच्या कृपेने आणि आपल्या भाग्याने शिवाजी हा लवकरच नेस्तनाबूद होईल अशी मला आशा आहे.

सोलापूरच्या प्रकरणासंबंधी आपण काहीच लिहिले नाही. व्यापाऱ्यांचे सोंग देऊन मी पाठविलेली माणसे अद्याप परत आली नाहीत. दक्षिणी लोकांच्या शब्दावर विश्वास ठेवता येत नाही. विजापुराकडून उत्तर येईपर्यंत मला जसे योग्य दिसेल तसे मी करीनच. पण आपली इच्छा काय आहे हे मला कळले तर बरे.

बादशहा सलामत, शिवाजीचा प्रदेश उध्वस्त करण्यासाठी दाऊदखान, राजा रायसिंग आणि इतर सरदार यांना मी रवाना केले होते. ती हकीकत मी आपल्याला यापूर्वी कळविली आहे. शव्वाल महिन्याच्या एकवीस तारखेस हे सरदार रोहिडा किल्ल्याच्या जवळ पोहोचले (सत्तावीस एप्रिल १६६५). त्या भागातील सुमारे पन्नास खेडी त्यांनी जाळून उध्वस्त केली. डोंगराच्या कुशीत चार समृद्ध खेडी होती. अद्यापपर्यंत मोगलांच्या फौजा तिकडे गेल्या नव्हत्या. आमच्या तुकड्या त्या खेड्यांवर चालून गेल्या. आपल्याला अधिक कुमक हवी असे त्यांनी सांगून पाठविले. दाऊदखानाने अघाडी (हरावल) ची फौज देऊन राजा रायसिंग आणि अचलसिंग कछवाहा यांना त्यांची मदत करण्या-








साठी म्हणून पाठविले. बादशहाच्या भाग्याने शत्रू ती गावे सोडून पळून गेले. आमच्या सैन्यांनी ती गावे जाळून उध्वस्त केली. अनेक माणसे आणि जनावरे यांना पकडण्यात आले. शव्वाल महिन्याच्या बावीस तारखेस ( अठ्ठावीस एप्रिल १६६५ ) आमच्या सैन्याने तेथेच तळ दिला. दुसऱ्या दिवशी आमचे सैन्य राजगडाच्या रोखाने निघाले. वाटेतील गावे जाळीत आणि सगळा प्रदेश उध्वस्त करीत शव्वाल महिन्याच्या चोवीस तारखेस ( तीस एप्रिल १६६५ ) आमचे सैन्य राजगड किल्ल्याच्या पायथ्याशी पोहोंचले. आमच्या आघाडीच्या पथकांतील सैनिक किल्ल्याच्या प्रवेशद्वारापर्यंत पोहोंचले होते; पण किल्ल्यातील लोकांना बाहेर पडण्याची हिंमत झाली नाही. आमचे सैनिक तेथे फार वेळ थांबले नाहीत. त्यांनी जवळपासची खेडी जाळून बेचिराख केली, तो भाग डोंगराळ आहे, म्हणून तेथून दोन कोसावर योग्य जागा पाहून आमच्या सैन्याने तेथे तळ दिला. शव्वाल महिन्याच्या पंचवीस तारखेस ( एक मे १६६५ ) हे सैन्य शिवापुरास परतले. शव्वाल महिन्याच्या सव्वीस तारखेस ( दोन मे १६६५ ) या सैन्याने कोंडाण्याच्या भोंवतालचा प्रदेश उध्वस्त केला.

मी दाऊदखानाला लिहिले की लोहगड भागात शिवाजीचे सैन्य गोळा झाले आहे असे ऐकण्यात आहे तर तुम्ही जरूर असेल तितके सैन्य बरोबर घेऊन तिकडे जा आणि शत्रूचा मोड करून या. दाऊदखान हा शव्वाल महिन्याच्या सत्तावीस तारखेस ( तीन मे, १६६५ ) पुण्याला आला. कुतुबुद्दीनखान याला पण मी लिहिले होते. त्याने धामधूम आवरती घेतली. शिवाजीच्या इलाख्यातील काही कैदी आणि जनावरे ही घेऊन तो पुण्यास आला. तेथे त्याची आणि दाऊदखान यांची गाठ पडली. शव्वाल महिन्याच्या अठ्ठावीस तारखेस ( चार मे १६६५ ) ते दोघे पुण्याहून निघाले. पुण्याहून पाच सहा कोस अंतरावर असलेल्या चिंचवड या गावी त्यांनी तळ दिला. एकोणतीस तारखेस ( पाच मे १६६५ ) दाऊदखान, राजा रायसिंग इत्यादींनी आपले सैन्य तयार करून पुढे कूच केले. टेहळणीसाठी त्यांनी मोगलांची पथके पुढे रवाना केली. ही पथके पोहोचताच शत्रुसैन्य गोळा होऊन त्यांच्याशी मारामारी करू लागले. आमची पथके ठाण मांडून लढू लागली. त्याबरोबरच त्यांनी दाऊदखानाकडे कुमकेची मागणी केली. दाऊदखानाने राजा रायसिंग, अचलसिंग, आणि कुतुबुद्दीनखान यांस पाठविले. त्यांच्या तुकड्यांनी शत्रूवर चाल केली. आणि बाण व बंदुकी यांचा मारा केला. निकराची लढाई झाली. शत्रूपैकी कित्येकजण मारले गेले. कित्येक जखमी झाले. बाकीचे लोहगडच्या दिशेने पळून गेले. मोगलांनी त्यांचा पाठलाग केला आणि लोहगड आणि जवळील इतर तीन किल्ल्यांच्या मधील मैदानात आपला तळ दिला. कुतुबुद्दीनखान याने उत्कृष्ट कामगिरी केली. तो धन्य होय. राजा रायसिंग यानेही त्याला उत्तमप्रकारे साथ दिली. आपल्या सेवकांनी बालाघाट आणि पाईनघाटावर असलेल्या शत्रूंचा मोड करून तो प्रदेश पूर्णपणे उध्वस्त केला. या नंतर जिल्कादच्या चवदा तारखेस ( एकोणिस मे १६६५ ) ते मुख्य लष्करात येऊन दाखल झाले.

कुतुबुद्दीनखान आणि त्याचे इतर सहकारी यांचे आपण कौतुक कराल अशी मी आशा करतो. त्यांच्या संबंधी मी माझा मुलगा रामसिंग यास लिहिले होते, ते त्याने आपल्याला कळविले असेलच. माझी विनंति मान्य झाल्यास मला आणि कुतुबुद्दीनखान यांना धन्यता वाटेल.

बादशहा सलामत, आमच्या काही तुकड्या चहूकडे देश उध्वस्त करण्यासाठी फिरत आहेत. बरेचसे सैन्य किल्ल्याच्या वेढ्यात गुंतले आहे. मुख्य तळावर थोडेच सैन्य राहिले आहे. असे असूनही परमेश्वर कृपेने आणि आपल्या भाग्याने कहीचे रक्षण आणि सतत गस्त घालीत राहाणे हा कामे चालू आहेत. किल्ल्याचा वेढा अधिक कडक करण्यात आला आहे. आपला निरोप घेतेवेळी आपण आज्ञा केली होती की शिवाजीच्या प्रदेशात मोहीम करण्यास अनुकूल काल सहा महिने असतो. म्हणून तुम्ही तेथे लवकर जाऊन पोहोचावे. त्या वेळी मी आपल्याला कळविले होते की मोहिमेची स्थळे व्यवस्थितपणे निवडण्यात आली तर आपली फौज बारा महिन्याच्यावर गुंतून राहाणार नाही. पण आता परमेश्वरकृपेने अशी परिस्थिति आहे की किल्ल्याचा वेढा जोरात चालू आहे. परमेश्वर करील तर पावसाळ्यातच काम उरकून टाकण्यात कसूर होणार नाही. योग्य वाटेल ते लिहिले.



अनुक्रमणिका






( ११ )

विनंति की जिल्काद महिन्याच्या चोवीस तारखेस ( एकोणतीस मे १६६५ ) आपले पत्र पावले. पाच तोफा आपण तातडीने रवाना केल्या ही आपली कृपाच होय. दौलताबादेतील तोफा महमदहुसेन याच्या देखरेखीखाली होत्या. सफशिकनखान याने तोफा रवाना करण्यात खूप श्रम घेतले. आम्हाला या मोहिमेसाठी लागणारे सर्व प्रकारचे साहित्य पुरविण्यात सफशिकनखान याने काही कमी केले नाही. त्याच्यासंबंधी मी आपल्याला लिहिले असून त्याने अशाच प्रकारे यापुढेही उत्तम काम करीत असावे अशा अर्थाची त्याला आपली आज्ञा व्हावी.

बादशहा सलामत, पुरंदरच्या वेढ्यासंबंधी आपण लिहिले आहे. रात्रंदिवस मी त्याच उद्योगात गुंतलो आहे. वास्तविक पाहता पावसाळ्यात मोहिमांची कामे थांबतात. पण ऐन पावसाळ्यात आम्ही वेढ्याचे काम हाती घेतले आहे. आपल्या कृपेने जी कामे एक महिन्यात पार पडणे शक्य नव्हते ती एकेका दिवसात तडीस जाऊ लागली आहेत. वेढ्याचा एक एक दिवस म्हणजे मी एक वर्ष असे समजतो. रोज येथे कामे उत्तम रीतीने पार पडत आहेत. पुरंदरकिल्ल्याच्या संरक्षणाला आवश्यक आणि किल्ल्याला लागून असलेला खडकाळा या स्थळाचे पाच बुरूज आणि लाकडी तटाने युक्त असलेले शत्रूचे एक आश्रयस्थान ही आम्ही जिंकून घेतली. आमच्या लष्करातून आपल्याकडे येणाऱ्या सरकारी रिपोर्टात याचा तपशील दिलेला असल्यामुळे मी या पत्रात त्यासबंधी अधिक लिहीत नाही. पुरंदरचा किल्ला आम्ही लवकर जिंकून घेऊ याची आपण खात्री बाळगावी.

बादशहासलामत, राजा सुजानसिंग हा आपल्या सैन्यासहित लष्करात दाखल झाला. राजगड आणि रोहिडा या दिशेने शत्रूची येजा असे. तो मार्ग रोखून धरण्यासाठी मी सुजानसिंगाची नेमणूक केली. तो कोणत्याही प्रकारची टाळाटाळ न करता राजगड रोहिड्याकडे रवाना झाला. सुजानसिंग हा कामाचा मनुष्य आहे. तो वेळेवर लष्करात दाखल झाला नाही म्हणून त्याची मन्सब पाचशेनी कमी करण्यात आली होती. ती त्याला परत मिळावी अशी विनंति आहे. म्हणजे तो आपला सरंजाम वगैरे व्यवस्थितपणे चालवू शकेल आणि सैन्य बाळगून त्याचा खर्च चालविण्यात त्याला अडचण पडणार नाही. लष्करातील अधिकाऱ्यांचे आणि सैनिकांचे पगार आणि लष्करावरील इतर खर्च या संबंधी सगळे कागदपत्र उम्दतुल्मुल्क जाफरखान ( मुख्य वजीर ) याजकडे पाठविले आहेत. ते आपल्या समोर येतीलच.

बादशहा सलामत, आपल्या आज्ञेप्रमाणे मी मुल्ला याहया याचा भाऊ मुल्ला अहमद यास लिहून कळविले की तुम्ही विजापूरला राहून बादशहाची कामे करू शकलात तर चांगलेच आहे. तुम्ही दोन कामे करावी : एक म्हणजे शिवाजी आणि आदिलखान यांच्यातील एकोपा मोडावा. दुसरे म्हणजे विजापूरचे सैन्य आमच्याकडे तैनात झाले पाहिजे. मुल्ला अहमद याने सांगून पाठविले आहे की मला जितके जमेल तितके या प्रकरणात मी करण्यास तयार आहे.

मी विजापूरचा वकील मुल्ला खुऱ्रम यास म्हटले की विजापूरकरांकडून काय धोरण आखले जात आहे याची आपल्याला काही माहिती नाही. तिकडून मुल्ला अहमद हा वकील होऊन आला तर बरे. इतक्यात मुल्ला याहया याच्या पत्रावरून कळले की आदिलखान ( आदिलशहा ) याजकडे मी माणसे पाठविली होती; ती तेथे पोहोचल्यानंतर आदिलखानाने त्याला ( मुल्ला अहमद ) मध्यस्थ म्हणून नेमले आहे. ते पत्र मी आपल्याकडे पाठवीत आहे. विजापूर आणि त्या भोवतालच्या प्रदेशासंबंधी तपशीलवार हकीकत महमद इब्राहीम याने लिहून पाठविली आहे. ती मी आपल्याकडे पाठवीत आहे. ती आपल्या नजरेखालून जाईलच.

**समारोप**

शेवटच्या पत्रात उल्लेखिलेले बुरुज मोगलांनी दोन जून १६६५ रोजी जिंकून घेतले. पुरंदरचा किल्ला आता मोगलाविरुद्ध फार दिवस टिकाव धरू शकेल असे दिसेना. अशा परिस्थितीत शिवाजीमहाराजांनी मोगलाबरोबर तह करण्याचे ठरविले. त्यांनी अकरा जून १६६५ रोजी जयसिंगाची गाठ घेतली. तेवीस जूनच्या पुरंदरच्या तहाने जयसिंगाची मोहीम संपली. वरील पत्रांनी जयसिंगाच्या हालचालीवर उत्तम प्रकाश पडतो. या दृष्टीने अद्याप अप्रकाशित असलेली वरील पत्रे मराठ्यांच्या इतिहासाची साधने म्हणून महत्त्वाची ठरतात.



अनुक्रमणिका






प्रा. कु. चंद्रप्रभा प्रभू

# सुवर्णनियंत्रण

स्वातंत्र्योत्तर कालात जारी केल्या गेलेल्या सर्व कायद्यात सुवर्णनियंत्रण कायद्याइतका खळबळजनक व जवळजवळ तमाम भारतीय नागरिकांच्या आयुष्याशी निगडित असा दुसरा कुठलाच कायदा नसेल असे म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही. कूळ-कायदा, दारुबंदी, वगैरे अमलात आल्यावर बरीच गडबड उडाली होती, नाही असे नाही; पण या कायद्याशी तुलना करता त्यांचे क्षेत्र मर्यादितच म्हणावे लागेल. सुवर्णनियंत्रणकायद्याची झळ मात्र काही अपवादात्मक लोक सोडल्यास आम जनतेला पोचणार होती. सुवर्णकारागीर, सोन्याचे व्यापारी, नि सोन्याची चोरटी आयात करणारे लोक, हे तर उघडउघड कायद्याच्या कचाट्यात सापडले होतेच, पण स्टॅन्ले जेव्हॉन्सने 'सोन्याची खाण' म्हणून संबोधलेल्या या देशातील कुठलाही घटक असा नाही की ज्याला या कायद्याचा संपर्क होणार नाही, मग तो अगदी लहानातल्या लहान खेड्यातला शेत-करी असो, की मोठ्यातल्या मोठ्या शहरातला उद्योग-पती असो, नाहीतर सर्वसाधारण मध्यम वर्गीय माणूस असो. वेळप्रसंगी येणाऱ्या अडचणींना, मग त्या शेतकी व्यवसायातील असोत, व्यापारातील असोत, नाहीतर संसारातील असोत, तोंड देण्याचे सर्वात प्रभावी साधन म्हणूनच जवळचे सोनेनाणे जपले जाई. भारतीय स्त्रीवर्गाच्या सोन्याविषयीच्या आकर्षणाला तर सुमारच नाही. सौंदर्यवृद्धीसाठी वापरण्यात येणारे दागदागिने जरी थोडावेळ नजरेआड केले (अर्थात तसे करणे बरोबर ठरणार नाही, कारण हा भागही फार महत्त्वाचा आहे) तरी सोन्याची मोहिनी स्त्रियांवर किती आहे हे सोन्यात मढविलेली सहाण गळयात बांधून घ्यावयास तयार झालेल्या कामचुकार सुनेच्या कथेसारख्या कितीक लोककथां-वरून विदित होत नाही काय ? आपल्याकडे पूर्वा-पार चालत आलेल्या 'स्त्रीधनाच्या' कल्पना भार-तीय स्त्रीच्या आयुष्यातील सोन्याचे महत्त्वच दर्श-वीत नाहीत काय ? पुरुषसत्ताक कुटुंबपद्धतीत आर्थिकदृष्ट्या परतंत्र असलेल्या स्त्रीला वेळप्रसंगी हे जवळ असलेले दागिनेच हात देतात हे तर आपण अनेकवेळा पहातो व ऐकतो. बाकी कसेही असले तरी आभूषणाविना स्त्री ही कल्पनाच भार-तीय मनाला पटत नाही. आणि कविकुलगुरु कालि-दास नि बाणभट्ट यांपासून तो आजचे नवकवी, किंचित्कवी, नि लघुकादंबरीकार, या सर्वांनी याला खतपाणी घातले आहे. आभूषणे ही जणूकाही स्त्रीच्या व्यक्तिमत्त्वाचा एक घटक होऊन बसली आहेत नि त्याबरोबरच सुवर्णाला मानाचे स्थान मिळाले आहे. या सर्व गोष्टींचा विचार करता, ९ जानेवारी १९६३ रोजी नभोवाणीवरून सुवर्णनियंत्रणकायदा जाहीर झाल्याबरोबर लोकांना हे भलतेच काहीतरी घडते आहे, असे वाटल्यास नवल नाही. शतकानु-शतके भारतीय जनतेवर संपूर्ण सार्वभौमत्व गाजवि-लेल्या या धातुसम्राटावर निर्बंध घालणे म्हणजे बहुजनसमाजाला त्यांच्या आवलनशक्तिपलीकडचे काहीतरी वाटत होते ! त्यांनी ही गोष्ट ध्यानीमनी तर राहोच, पण स्वप्नी सुद्धा अपेक्षिली नव्हती !

### नियंत्रण अगदी अनपेक्षित

सर्वसामान्य जनताच नव्हे तर ज्यांना आर्थिक विकासमार्गावर अडखळत पावले टाकणाऱ्या भारता-पुढे आ वासून उभ्या ठाकलेल्या अनंत अडचणींची








सांगोपांग माहिती आहे असे काही अर्थशास्त्रज्ञ व समाजधुरीण लोकसुद्धा थोडावेळ आश्चर्यचकित झाले. अर्थात या मागची कारणमीमांसा मात्र सर्व-सामान्य जनतेला वाटणाऱ्या आश्चर्यामागच्या कारणां-हून वेगळी होती. आपल्या देशात आर्थिक नियो-जनाला प्रारंभ झाल्यावर उपलब्ध साधनसामुग्रींचा विचार करताना देशातील सुवर्णसाठ्यांचा उपयोग देशाच्या प्रगतीकरिता कसा करून घेता येईल या प्रश्नाचा विचार अनेकवेळा झालेला आहे. कारण आंतरराष्ट्रीय व्यवहारात सोन्याला तसेच अतिशय महत्त्वाचे स्थान आहे, अनेक उपाय सुचविले गेले. विशेषत: एकूण खाजगी सुवर्णसाठ्यात आहे त्यापेक्षा अधिक वाढ होऊ नये, यासाठी काय योजना कराव्यात ते चर्चिले गेले, पण निष्पन्न मात्र काहीच झाले नाही. बहुधा शेवटी असाच निष्कर्ष काढला जाई की सोन्यासंबंधी कुठलाही कायदा करावयाचा म्हटले तरी तो फार मूलगामी, विशेषत: आपल्या अनेक चालीरीती नि रिवाज यांना बाधक ठरण्याचा संभव असल्यामुळे त्यापासून फायद्याऐवजी तोटाच होईल. प्रथम जनमत सुवर्णनियंत्रणाला पोषक बनविले पाहिजे व त्यासाठी बराच कालावधि गेला पाहिजे, असे या लोकांचे म्हणणे. सुवर्णरोखे सुरू झाल्यावर सरकारने या दिशेने पावले टाकण्यास सुरवात केली आहे हे जरी त्यानी जाणले असले तरी सर्वव्यापी सुवर्णनियंत्रण इतक्या लवकर सुरू होईल ही कल्पना नव्हती व हेच या गटाच्या आश्चर्यवाटण्यामागचे कारण होय.

## चोरट्या आयातीची डोकेदुखी

आता आपण आपल्या देशातील सुवर्णनियंत्रणाचे थोडक्यात स्वरूप काय आहे ते पाहू. आपल्या देशातील अगदीच खडखडाट करीत जाणाऱ्या नियोजनाच्या गाडीच्या चाकांना खाजगी सुवर्ण-साठ्यांचा वंगण म्हणून नक्कीच उपयोग करता येईल; पण सुवर्णनियंत्रणामागचे मुख्य ध्येय मात्र ते ठेव-ण्यात आलेले नाही. अंतिम ध्येय आहे भारतीय लोकांना या पिवळ्या चकचकणाऱ्या धातूविषयींच्या आसक्तीच्या मगरमिठीतून सोडविणे. तथापि आज प्रथम ज्याला अतिशय प्राधान्य दिले आहे ते म्हणजे सोन्याची चोरटी आयात संपूर्ण नाहीशी करणे. परदेशातून होणारी ही चोरटी आयात सर-कारची एक डोकेदुखीच होऊन बसली आहे. याचे कारण कायदा धाब्यावर बसविला जातो, कर चुकविले जातात, इतकेच नव्हे तर भारतीय अर्थव्यवस्थेवर सुद्धा त्याचे फार दूरगामी दुष्परिणाम होतात.

## सोन्याच्या आंतरराष्ट्रीय किंमतीत आणि भारतीय किंमतीत तफावत

सर्वसाधारणपणे १९४०–४१ पासून आपल्या देशातील सोन्याची किंमत नि आंतरराष्ट्रीय बाजार-पेठेतील किंमत यात बराच फरक पडण्यास सुरवात झाली. दिवसेदिवस त्यात वाढ होऊ लागली. त्यामुळे बाहेर आंतरराष्ट्रीय भावाने सोने विकत घेऊन ते भारतांत जास्त भावाने विकणे फार किफायतशीर ठरू लागले. सरकारने सोन्याच्या आयातीवर निर्बंध घातल्यावरसुद्धा बेकायदेशीर मार्गाने सोने भारतात येतच राहिले. दरवर्षी ३० ते ५० कोटी रुपये किंमतीचे सोने बेकायदेशीरपणे भारतात आणले जाते असे समजते ! अर्थात् चोरटी आयात करणे हे काही सोपे काम नाही; त्यात अनंत अडचणी आहेत. जप्तीचे भय आहे, तुरुंगाची भीति आहे. पण या साऱ्यांना भीक न घालता एवढ्या प्रचंड प्रमाणात चोरटी आयात केली जाते तर त्यात नफाही तेवढाच जबरदस्त होत असला पाहिजे. प्रा. शेणॉय यांच्या मते हे फायद्याचे प्रमाण दरसाल ३७० ते ३९० टक्के इतके आहे ! कुठल्याही धंद्यापेक्षा हा धंदा नक्कीच फायदेशीर आहे यात संशय नाही. प्रा. शेणॉय यानी असेही दाखवून दिले आहे की आतापर्यंत जप्त झालेल्या सोन्याचे, सोन्याच्या चोरट्या आयातीशी प्रमाण पाहाता प्रत्येक १०० तोळे चोरून आण-लेल्या सोन्यातील २१ तोळे सोने, आयातीचा खर्च नि जप्तीमुळे येणारी तूट भरून काढू शकते. उरलेले











७९ तोळे सोने हा निव्वळ फायदा असतो ! याहून अधिक फायदेशीर व्यवसाय शोधू गेल्यास सापडणे कठीण ! देशातील एकूण परिस्थितीसुद्धा याला पोषकच आहे. लोकसंख्या वाढते आहे. नियोजन-जन्य वातावरणामुळे लोकांच्या हातात खेळणाऱ्या पैशात वाढ झाली आहे, नि त्याबरोबरच सोन्याच्या मागणीत दिवसेंदिवस वाढ होते आहे. पण यामुळे मुख्यत: खाजगी सुवर्णसाठे वाढत असल्यामुळे आर्थिक विकासाच्या दृष्टीने त्यांचा काहीच उपयोग होत नाही. फक्त चोरट्या आयातीला त्यामुळे जास्त-जास्त उत्तेजन मिळते एवढेच.

## आयातीला परदेशी चलन कोठून मिळते ?

प्रश्न पडतो तो एवढाच की हे सोने आणण्या-साठी आवश्यक असणारे परदेशी चलन कुठून मिळविले जाते ? मुख्यत्वेकरून हे परदेशांशी व्यापार करणारे व्यापारी पुरवितात. आयात करते वेळी आयात मालाची किंमत जास्त नोंदून नि निर्यात करताना निर्यात मालाची किंमत कमी दाखवून जी दुहेरी शिल्लक टाकली जाते ती चोरटी आयात करणाऱ्या व्यापाऱ्यांना काळ्या बाजारात भारतीय रुपयांच्या मोबदल्यात विकली जाते ! अर्थात् योग्य आंतरराष्ट्रीय किंमतीपेक्षा जास्त किंमत आकारून हे सांगावयास नकोच ! शिवाय परदेशात स्थायिक झालेल्या भारतीयांनी आपल्या येथील आप्तांना पाठविलेल्या पैशांच्या द्वारा किंवा परदेशी मदतीमुळे उपलब्ध होणाऱ्या परदेशी चलनाच्या मदतीने सुद्धा ही चोरटी आयात केली जाते. पण या सर्वांचा परिणाम एकच होतो; तो म्हणजे आधीच दुष्प्राप्य असलेल्या परदेशी चलनाच्या उपलब्ध साठ्याला चोहोबाजूनी गळती लागते, व विकासाचा मार्ग आणखीच दुष्कर होतो ! !

## कारभाराच्या यंत्रणेतील दोष मान्य करूनही

हे सर्व बंद करण्याकरिता एक उपाययोजना वारंवार सुचविली जाते. ती म्हणजे सरकारी यंत्रणा अतिशय कार्यक्षम करून या चोरट्या आयातीच्या धंद्याची पाळेमुळे खणून काढणे. पण जरी संपूर्ण सरकारी नोकरवर्ग लाचलुचपतीपासून पूर्णतया अलिप्त आहे असे म्हटले ( याबद्दल संदेह आहेच, पण ते असो ) तरीही २००० मैल पर्यंत पसरलेल्या भूमार्गावर आणि जलमार्गावर अहोरात्र वर्षानुवर्षे जागता पहारा ठेवणे म्हणजे काही हातचा खेळ नाही. ती जवळजवळ अशक्य कोटीतलीच गोष्ट आहे. सरकारने आतापर्यंत योजिलेल्या, पण बहुतांशी निष्फळ ठरलेल्या वेगवेगळ्या उपायांवरून हे चांगलेच सिद्ध होते. १९५५ मध्ये 'सी कस्टम्स् ॲक्ट' मध्ये करण्यात आलेले बदल, पर्शियन गल्फ विभागात सुरू करण्यात आलेल्या वेगळ्या रंगाच्या नोटा, चोरट्या सोन्याची जप्ती, आणि त्या संदर्भात ठोठावण्यात येणाऱ्या शिक्षा, या सर्वांचा सोन्याच्या बेकायदेशीर आयातीवर बहुतांशी काहीच परिणाम झालेला दिसून येत नाही ! जोपर्यंत वर दिल्याप्रमाणे या व्यवसायात अबाढव्य फायद्याची मोहिनी आहे, तोपर्यंत हे असेच राहाणार यातही शंका नाही.

## मागणीला लगाम पाहिजे

तथापि परिणाम होत नाही म्हणून प्रयत्न थांबविणे म्हणजे रोग असाध्य आहे, औषधांचा गुण येत नाही, म्हणून रोग्याला मरू देण्याचाच प्रकार नव्हे काय ? विशेषतः आपल्या देशासारख्या अर्धविकसित राष्ट्राला आर्थिक नियोजनाच्या काट्याकुट्यांनी नि खाचखळग्यांनी भरलेल्या वाटेवरून दौड करून— तीसुद्धा साधीसुधी नव्हे तर जोरदार दौड करून— आर्थिक प्रगतीचे ध्येयमंदिर गाठावयाचे असेल तर आधीच अपुऱ्या असलेल्या परदेशी चलनाच्या साठ्याला, सोन्याच्या चोरट्या आयातीमुळे लागलेली ही गळती काही करून थांबवावीच लागेल. शिवाय या आयातीवर सरकारला कुठल्याही प्रकारचा कर मिळत नसल्यामुळे दुहेरी तोटा आहे. खाजगी सुवर्णसाठ्यात पडलेल्या भरीचा उत्पादन वाढीला काडीमात्र उपयोग होत नाही. ही सर्व कारणपरंपरा चोरटी आयात बंद पाडण्याच्या खटा-










टोपाच्या मुळाशी आहे. पण हे कार्य साध्य करण्यास सुद्धा लोकांच्या मनातील सुवर्णासक्ती नाहीशी झाली पाहिजे. हे जर साध्य झाले तर पहिले ध्येय सिद्धीस जाणे फारसे कठीण नाही. कारण अर्थशास्त्रीय नियमां-प्रमाणे मागणीचा नि पुरवठ्याचा मेळ न बसल्या-मुळे सोन्याच्या किंमती भरमसाट वाढताहेत. मागणी कुठल्याही उपायाने कमी करता आली तर किंमती आपोआप खाली येतील व चोरटी आयात करणा-ऱ्यांच्या फायद्यात घट होऊन बेकायदेशीर आया-तीला आपोआप आळा बसेल.

### प्रत्यक्ष नि अप्रत्यक्ष उपाययोजना

सुवर्णनियंत्रण कायद्यान्वये या गोष्टी दोन मार्गांने साध्य करावयाच्या आहेत. प्रत्यक्ष नि अप्रत्यक्ष. प्रत्यक्ष उपाययोजना म्हणजे सोन्याच्या व्यवहारावर बंदी घालून, आणि अप्रत्यक्ष म्हणजे सोन्याची मागणी कमी करून ! आता पहिल्या प्रकारच्या उपाययोजने-साठी खालील मुख्य कलमे या कायद्यात आहेत.

( १ ) दागदागिने सोडून इतर कुठल्याही स्वरूपात व्यक्ती, संस्था, किंवा सोन्याचे व्यापारी यांच्याकडे असलेले सोने या कायद्याच्या कक्षेत येते. मात्र ते त्यांनी सरकारला कळविले पाहिजे. याला कायदा जारी झाल्यापासून ३० दिवसांची मुदत देण्यात आलेली होती. प्रत्येक व्यक्ती किंवा अवि-भक्त कुटुंब दागिन्याहून इतर स्वरूपात सुवर्ण किती बाळगू शकतात यासंबंधीचे नियम दिलेले होते.

( २ ) सोन्याचे व्यापारी व सुवर्णशुद्धी कर-णाऱ्या कारखान्यांचे मालक, या सर्वांना या कायद्यान्वये परवाने काढावे लागणार आहेत. आपल्या देवघेवीच्या व्यवहाराची नोंद त्यांनी ठेवा-वयाची आहे. सुरुवातीला यात फक्त मोठे व्यापारी व सुवर्णकार यांचाच समावेश होता, पण आता २२ सप्टेंबर १९६३ रोजी मध्यवर्ती सरकारने जे नवीन बदल करण्याचे जाहीर केले आहेत त्यायोगे सर्व स्वतंत्रपणे उद्योग करणाऱ्या सोनारांना, मग ते कितीही लहान असोत, मामुली फी आकारून परवाने देण्यात येणार आहेत.

( ३ ) व्यक्ती किंवा संस्था यांना यापुढे सोन्याचा कुठलाही खरेदीविक्रीचा व्यवहार करण्यास मनाई आहे. सर्व व्यवहार परवाने असलेल्या व्यापाऱ्यांमार्फत व्हावयाचे आहेत. एक वारसाहक्काने येणारे सोने सोडल्यास बाकी कुठल्याही उपायाने यापुढे सोने मिळविता येणार नाही.

ही झाली उघडउघड व्यवहारावर बंदी घालण्याकरिता करण्यात आलेली योजना. याशिवाय अप्रत्यक्षपणे सोन्याला मागणी कमी करून हा प्रश्न सोडविण्यासाठी खालील गोष्टींचा समावेश कायद्यात करण्यात आलेला आहे.

१४ कॅरटपेक्षा जास्तीचे दागिने घडविणे व ते विकणे यास कायद्याने बंदी आहे. दागिन्यांशिवाय इतर कुठल्याही प्रकारच्या सोन्याच्या वस्तू घड-विण्यासही बंदी आहे. मूळ कायद्यात जुन्या दागिन्यां-पासून नवीन दागिने करावयाचे झाले तरी ते सुद्धा चौदा कॅरटपेक्षा जास्तीचे असू नयेत असा निर्बंध होता. आता नवीन केलेल्या फेरफारानुसार चौदा कॅरटपेक्षा जास्तीचे नवीन दागिने जुन्या दागिन्यां-पासून तयार करण्याची मुभा देण्यात आलेली आहे. अर्थात ही सवलत फक्त स्थित्यंतराच्या कालापुर-तीच असून अंतिम ध्येयात काहीच बदल होणार नाही, हे परत परत ठासून जाहीर करण्यात आले आहे. या नवीन बदललेल्या कायद्यात घरबसल्या कामे करणाऱ्या कारागिरांना, जर ते परवाना बाळगणाऱ्या व्यापाऱ्याला मालाचा पुरवठा करीत असतील तर १४ कॅरटपर्यंतच्या सोन्याचे मर्यादित साठे जवळ बाळगण्याची मुभा आहे.

वरील सर्व विवेचनावरून एक गोष्ट मात्र स्पष्ट होते, ती म्हणजे या कायद्याचा मुख्य रोख आहे सोन्याची चोरटी आयात थांबविण्याचा. हा कायदा म्हणजे स्त्रीसमाजाचे दागिने हिसकावून घेण्याचा सरकारचा एक प्रयत्न आहे असा जो आरोप बऱ्याच वेळा केला जातो तो निराधार आहे.

## नियंत्रण यशस्वी होईल ?

सुवर्णनियंत्रण कायदा हा थोडक्यात असा आहे. आता प्रश्न असा की यामुळे आपले ईप्सित ध्येय साध्य होईल काय ? हे सुवर्णनियंत्रण यशस्वी होईल काय ? की पूर्वींच्या काही प्रयत्नांप्रमाणेच फसलेला प्रयत्न म्हणून हा कायदा इतिहासजमा करावा लागेल ? आपला आतापर्यंतचा अनुभव काय सांगतो ? या सुवर्णनियंत्रणाविषयी साशंकता दर्शविली जाते याचे मुख्यत्वेकरून कारण म्हणजे त्यात असलेली एक मोठी पळवाट होय. या कायद्याने प्रत्येक खाजगी व्यक्तीला दागिन्यांच्या स्वरूपात कितीही किमतीचे सोने जवळ बाळगण्याची मुभा आहे ! त्यावर कसलेही निर्बंध नाहीत. त्यामुळे कायद्याची अंमलबजावणी सुरू झाल्यावर फार मोठ्या प्रमाणावर दागिन्यांची— तीसुद्धा १४ कॅरट नव्हे तर अस्सल १०० नंबरी सोन्याच्या दागिन्यांची— निर्मिती झाली व होत आहे, असे आपण कितीतरी वेळा ऐकतो. शिवाय मूळ कायद्यात सुद्धा दागिन्यांहून इतर स्वरूपात असलेले सोने जाहीर करण्यास तीस दिवसांची मुदत दिलेली होती. त्यामुळे या सोन्याचे रूपांतर दागिन्यात करून घेणे फारच सोपे होते. या पळवाटेनें पळून जाणे फारच सोपे, निर्धास्त नि सोयिस्कर असल्यामुळे तिचा आश्रय अनेकांनी घेतला नसता तरच नवल !

याशिवाय आपल्या देशातील एकूण सुवर्णसाठ्यापैकी ८० टक्के सोने दागिन्यांच्या स्वरूपात असल्यामुळे ते सर्व कायद्याच्या क्षेत्राबाहेरचे आहे. फक्त २० टक्के सोनेच काय ते कायद्याच्या कक्षेत येते. सर्वसाधारण माणसाला कायद्याने त्रास होऊ नये म्हणून आखलेली ही योजना कितीही स्तुत्य असली तरी यशस्वी अंमलबजावणीच्या मार्गातली सर्वात मोठी अडचण तीच ठरणार आहे. कारण यामुळे सोन्याचे दागिने घडविण्याला फार उत्तेजन मिळते आहे. शिवाय मुख्य, मुख्य व्यापारी परवान्यामुळे प्रत्यक्ष कायद्याखाली येत असले तरी खेडोपाडी पसरलेले असंख्य कारागीर हे काम करून द्यावयास तयार आहेत. त्यात तशी विशेष अडचण पण नाही. शिवाय आपल्याच काय पण जगातील अतिशय नावाजलेल्या कार्यक्षम सरकारी यंत्रणेला सुद्धा, अशा प्रत्येकाला हुडकून काढून त्याचा गुन्हा शाबीत करणे अशक्य आहे. केवळ वादाकरिता असेही मान्य केले की आपल्या देशात कडक पहाऱ्यामुळे असे दागिने घडविले जात नाहीत, तरीही आपल्या शेजारच्या देशात किंवा जेथून जेथून चोरट्या सोन्याची आयात केली जाते, तेथे तेथे सोनारांना काही तोटा नाही ! यामुळे होईल काय तर सोन्याच्या लगड्यांऐवजी तयार दागिन्यांची आयात सुरू होईल ! जोपर्यंत सोन्याला मागणी आहे तोपर्यंत या दागिन्यांच्या व्यवहारातं फायदा पण भरपूर राहील. खाजगी दागिन्यांच्या साठ्यावर कसलेही निर्बंध नाहीत. त्यामुळे बेकायदेशीर मार्गाने सोन्याचे दागिने आणून ते काळ्या बाजारात विकण्याचा धंदा तेजीत आला आहे, असे जे आपण ऐकतो त्यात बरेच तथ्य असावे असे वाटते.

## पळवाट रुंदावत गेली !

या गोष्टींना आळा घालण्यासाठी असे सुचविले गेले होते की प्रत्येक खाजगी व्यक्ती किंवा संस्था याचेकडील दागिन्यांचा साठासुद्धा सरकारला कळविण्यास लावणे व ठराविक मर्यादेवर दागिन्यांवर सुद्धा निर्बंध घालणे. त्यामुळे निदान चारचौघांत दागिन्यांचे प्रदर्शन करावयास तरी लोक कचरतील आणि आपल्या श्रीमंतीचे प्रदर्शन करावयास मिळावे म्हणून जी दागिने घडवून घेण्याची चुरस लागलेली असते ती थांबेल. पण आज असे काही झालेले नाहीच, पण नवीन बदललेल्या कायद्याप्रमाणे जुने दागिने नवीन करून घ्यावयाचे असतील तर ते चौदा कॅरटपेक्षा जास्तीचे करून घ्यावयास मुभा असल्यामुळे, आंधळा मागतो एक डोळा नि देव देतो दोन, अशी अक्षरशः चोरटी आयात करणारांची चंगळ झाली आहे. आधीची पळवाट आता राजरस्त्याइतकी रुंद झाली








आहे. नियंत्रणाच्या यशस्वितेच्या दृष्टीने ही एक हानिकारक गोष्ट ठरल्याशिवाय राहाणार नाही.

हे झाले कायद्यात असलेल्या पळवाटासंबंधी. सरकारी यंत्रणेच्या अकार्यक्षमतेमुळे नवीन प्रश्न निर्माण होतात ते वेगळेच. कायद्याच्या अंमलबजावणीच्या सुरुवातीपासूनच या अकार्यक्षमतेचे साद पडसाद उठू लागले आहेत. सुवर्णकारागिरांच्या बेकारीचा प्रश्न सरकारने आधी विचारात घेतला होता की नाही, असा एक प्रश्न विचारला जातो. पण सुवर्णशुद्धीकरणाच्या कारखान्यांचे मालक नि त्यांचे हस्तक याची चांगलीच पोळी पिकली आहे. सरकारी यंत्रणा पुरेशी जागरूक तर नाहीच पण सुसूत्र योजनाबद्धतेचाही अभाव आहे असे जे आरोप केले जातात ते बऱ्याच अंशी खरे आहेत, असे गेल्या दहा अकरा महिन्यातील परिस्थितीचे सिंहावलोकन करता आढळून येते !

## सुवर्णकारांची बेकारी

नियंत्रण लादले गेले ते इतके अकस्मात् नि सर्वव्यापी स्वरूपाचे होते की काही काळ तरी शतकानुशतके चालत आलेल्या आपल्या धंद्यावर आकाशाची कुऱ्हाडच कोसळली की काय, असे सोनार संप्रदायाला वाटल्यास ते स्वाभाविक ठरेल. काही ठिकाणी सोनारांनी आत्महत्या केल्याचे सुद्धा आपण वृत्तपत्रातून वाचले. सरकारविरोधी पक्षांनी या किंवा अशा गोष्टींचे भांडवल करून जनतेपुढे एक अवास्तव चित्र रेखाटण्याचा प्रयत्न केला. सुवर्णकारागिरी नष्ट करण्यापासून तो मध्यमवर्गीयांना पिळून काढण्यापर्यंतचे अनेक आरोप सरकारवर लादण्यात आले. या पक्षांच्या मते निदान ५० लाख सोनार तरी बेकार झाले आहेत ! खानेसुमारीच्या आकड्यांच्या आधारे पाहू गेल्यास हे विधान अतिरंजित आहे असे म्हणावे लागते. साधारणपणे एक लाख पंचवीस हजार माणसांपेक्षा जास्त लोकांस या कायद्याची झळ पोहोचणार नाही. फारतर दोन लाख धरा. पण दोन लाख, कुठे नि पन्नास लाख- कुठे ! शिवाय यातील सर्वच लोक सर्व काळ बेकारीच्या गर्तेत ढकलले जातील असे नाही. कारण बहुतेक छोटे सोनार, विशेषतः खेड्यापाड्यातले, सुवर्णकार नसून प्रामुख्याने रौप्यकार (Silversmith) आहेत, नि त्यांचा व्यवसाय सोन्याऐवजी चांदीशीच जास्त निगडित आहे. शिवाय जे सुवर्णकार आहेत त्यांनासुद्धा संपूर्ण बेकारी येईल असे नाही. कारण नजीकच्या भविष्यकाळात तरी १४ कॅरटच्या दागिन्यांना मागणी नक्कीच आहे.

## छुपे वरदान ?

उलटपक्षी सुवर्णनियंत्रण कायदा सोनारांना त्रासदायक नसून त्यांना ते एक छुपे वरदानच ठरले आहे, असे म्हणणाऱ्यांचा पण एक गट आहे. त्यांच्यामते १४ कॅरटच्या सोन्याच्या लगडींपासून हव्या त्या आकाराचे, प्रकारांचे, जडावाचे तसेच मीनाकामाचे, दागिने करण्यास कुठलीच अडचण येत नाही. सुवर्णबाजारातील नफेबाजीला ऊत आला आहे असेही या गटाने पुराव्यानिशी सिद्ध केले आहे, ते सर्वस्वी खोटे नाही. कारण गरजू लोकांना आता दोन्हीकडून पिळले जात आहे. सोन्याच्या किंमतीत वाढ आहेच, पण दागिन्यांची घडणावळही भरमसाट वाढविली गेली आहे. ती इतकी की काहीवेळा हे वाढीचे प्रमाण १०० टक्के किंवा त्याहूनही जास्त आहे ! ! १४ कॅरटचे दागिने घडविणे जिकीरीचे असल्यामुळे घडणावळ जास्त घ्यावी लागते असे काहीवेळा याचे समर्थन केले जाते. पण प्रश्न पडतो तो हा की घडणावळीत १०० टक्के किंवा त्याहूनही जास्त वाढ व्हावी इतक्या का या अडचणी बिकट आहेत ? पण या सर्व नफेबाजीनंतरही १४ कॅरटचे दागिने बावीस कॅरटच्या दागिन्यांपेक्षा स्वस्तात विकणे शक्य असल्यामुळे मागणी वाढतेच आहे व सोनारांना परत किंमती वाढवायला चारी दिशा मोकळ्या होतातच आहेत ! खरे पाहू गेल्यास नियंत्रणामुळे त्रास कुणाला झाला असेल तर तो सामान्य जनतेला, सोनारांना नव्हे. कारण सर्व-





अनुक्रमणिका

साधारण माणसाला आता शुद्ध सोन्याचे दागिने तर मिळत नाहीतच, पण या कमी दर्जाच्या दागिन्याकरिता वर दिलेल्या नफेबाजीमुळे त्यांच्या योग्य किंमतीपेक्षा जास्त किंमत द्यावी लागते. शिवाय २२ कॅरटचे दागिने करवून मिळाले तरी ते पूर्वीसारखे खुल्या बाजारात पारखून घेता येत नसल्यामुळे त्यात फसवणूक झाली तर तक्रार करता येत नाही ! सगळाच चोरीचा मामला ! एकूण काय तर सामान्य जनता चांगलीच गोत्यात आली आहे ! असे वाटू लागते की समाजाच्या कुठल्याही दुष्ट चक्रात, सामान्य माणूस पिळून निघण्यासाठीच अस्तित्वात आला आहे की काय ?

## बेजबाबदार उत्तरे नकोत

वरील दोन्ही गटातील अतिशयोक्त विधाने वजा केली तरी एक गोष्ट मात्र निःसंशय मान्य करावी लागेल. ती म्हणजे हा बेकार सोनारांचा प्रश्न सरकारला तसाच वाऱ्यावर सोडून हात झटकून मोकळे होता येणार नाही. काही सोनारांना यामुळे फायदा झालेला असला तरी छोटे सोनार, रोजगारीवर कामाला असलेले सुवर्णकारागीर, याना या कायद्याने त्रासच झाला आहे. माजी अर्थमंत्र्यानी या संदर्भात असे म्हटले होते की भारतासारख्या विस्तृत देशात उपलब्ध असलेल्या वेगवेगळया संधीचा फायदा घेऊन सोनारांना आपला जम बसविता येईल, पण असे म्हणणे म्हणजे हिमालयावर जाण्यास अनेक वाटा आहेत, त्यापैकी चढणाऱ्यांना कुठल्याही वाटेने जाता येईल, असे म्हणण्यासारखेच नाही काय ? पहिल्या पंचवार्षिक योजनेच्या शेवटी असलेल्या बेकारांच्या संख्येपेक्षां दुसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या अखेरीला बेकारांच्या संख्येत वाढ झाली आहे. दर वर्षाकाठी त्यात भर पडतेच आहे ! देशातील या सत्यपरिस्थितीचा अर्थमंत्र्यांच्या वरील विधानाशी कसा मेळ बसवावा हेच कळत नाही. सुवर्णनियंत्रण मंडळाने सुवर्णकारांच्या प्रतिनिधींना दिलेली बेजबाबदार उत्तरे वाचून आश्चर्य वाटल्याशिवाय राहात नाही. हजारो सुवर्णकारांची उपजीविका ज्या धंद्यावर अवलंबून आहे, त्यातील मूलभूत प्रश्न काय आहेत, ते कसे सोडविता येतील, याचा सखोल अभ्यास करून त्यावर उपाययोजना झाल्याशिवाय सरकारला लोकांच्या सहकार्याची अपेक्षा करता येणार नाही. बेपर्वाईची वृत्ती सोडून खादी आणि ग्रामोद्योग संघटनेसारखीच एखादी सुवर्णकारांची संघटना अस्तित्वात आणल्यास बेकारीचा प्रश्नही काही अंशी सुटेल नि या लोकांच्या कलेचा देशहितासाठी उपयोग करता येईल.

कुठल्याही सामाजिक क्रांतिकालात समाजाच्या काही स्तरातील लोकाना अतिशय तापदायक परिस्थिती अनुभवावी लागते, हे जरी खरे असले तरी ‘जे घडणार ते चुकेना’ अशी अकर्मण्य प्रवृत्ती सरकारने दाखवून लोकानाच आपली विस्कटलेली घडी पुन्हा बसवावयास सांगणे क्षम्य ठरणार नाही. सरकारने या लोकांना जे जे सहाय्य करणे शक्य असेल ते ते करून आपल्या पायावर पुनः उभे राहाण्यास मदत केली पाहिजे. आपण त्या गावचेच नाही, किंवा आपला या सगळयाशी काही संबंध नाही, अशी बेफिकिर वृत्ती सरकारने धारण केली तर नियंत्रणाचा खेळखंडोबा होईलच, पण शिवाय या ठिणगीचा वणवा पेटून देशात अराजकता माजावयास वेळ लागणार नाही. विरोधीपक्षांना आपली पोळी या तापलेल्या तव्यावर खरपूस भाजून घ्यायची सुवर्णसंधि आयतीच मिळेल ! या परिस्थितीत अत्यावश्यक कुठली गोष्ट असेल तर ती ही की या बेकारांच्या पुनर्वसनासाठी योग्य, वारंवार न बदलणारे, साधारण कायम स्वरूपाचे, धोरण ठेवून सरकारने त्या दिशेने पावले टाकावयास सुरुवात करणे, हे सर्व फार कुशलतेने करावे लागेल. सरकारचे चातुर्य यात पणास लागेल. थोडीशी चूक झाली तरी सारेच ऑफस् व्हायचे.








## विधायक दिशेने पाऊल

सरकारने या दिशेने पावले टाकावयास सुरुवात केली आहे ही त्यातल्यात्यात समाधानाची गोष्ट आहे. ७५००० सुवर्णकारागिरांच्या पुनर्वसनासाठी एक योजना आखण्यात आली आहे. अंदाजे १० कोटी रुपये त्यासाठी खर्च येणार आहे. या योजनेखाली सुवर्णकारागीरांना तांत्रिक शिक्षण देण्यात येणार आहे. शिक्षणकालात त्याना भत्ते देण्यात येणार आहेत. त्यांच्या मुलानां शैक्षणिक सवलती मिळतील. कुटीरोद्योग, छोटे व्यापारउदीम करण्यास सुवर्णकारांना कर्जे देण्यात येणार आहेत. याशिवाय सरकारने जेथे जेथे शक्य आहे तेथे तेथे सहकारी तत्त्वावर संघटना करण्यास प्रोत्साहन द्यावे. नव्या पिढीला भविष्यकाळाविषयी जास्त आशावादी दृष्टिकोन ठेवण्यास प्रवृत्त करावे. नवीन नवीन उद्योगधंद्यात शिरण्याविषयी त्यांची मने वळवावी. मुख्य गोष्ट हवी आहे ती ही की सरकारने आपल्याला या समस्येची जाणीव आहे आणि ती शक्य तितक्या लवकर सोडविण्यासाठी आपले प्रयत्न चालू आहेत हे लोकाना पटवून द्यावे. तरच सुवर्णनियंत्रणाच्या यशस्वितेसाठी जनतेच्या सहकार्याची अपेक्षा करण्यास सरकारला जागा आहे.

## उपलब्ध सोन्याचा समतोल पुरवठा

नियंत्रणामुळे दुसरी एक समस्या उद्भवते ती अशी की औद्योगिक आणि इतर गोष्टींसाठी असलेली सोन्याची मागणी यांचेकरिता सोन्याचा उपलब्धसाठा समतोलपणे पुरविणे. नियंत्रणामुळे लोकांची प्रवृत्ती शक्यतो खाजगी साठा तसाच टिकवून ठेवण्याकडे राहणार. आतापर्यंत चोरट्या आयातीमुळे मागणीचा नि पुरवठ्याचा मेळ कसातरी बसत असे, नियंत्रणामुळे आयात जर खरोखरच थांबली तर हाही झरा आटेल. पूर्वी पाहिल्याप्रमाणे १४ कॅरटच्या दागिन्यांना थोडे दिवस तरी मागणी असणारच. शिवाय परदेशी चलनाच्या प्राप्तीकरिता १४ कॅरटपेक्षा जास्त दर्जाच्या सोन्याच्या दागिन्यांच्या निर्यातीकरिता सुद्धा सोने पुरवावे लागणार. पुरवठा अल्प नि मागणी वाढती असा यक्षप्रश्न कसा सोडवायचा ? याकरिता सरकारला वेगवेगळ्या गोष्टीकरिता असलेली सोन्याची मागणी विचारात घेऊन त्यात योग्यप्रकारे सोने कसे विभागता येईल याची योजनाबद्ध आखणी करावी लागेल. हे काम तितकेसे सोपे नाही. कारण औद्योगिक गरजा तर भागल्या पाहिजेत, पण खाजगी साठेबाजीला वाव मिळता कामा नये, अशी तारेवरची कसरत साधावयाची आहे !

## अर्थमंत्र्यांच्या विधानाबद्दल शंका

नियंत्रणामुळे निर्माण झालेले तोटे फायद्यापुढे अगदीच फिके ठरले तरच कुठलेही नियंत्रण समर्थनीय ठरू शकेल. या दृष्टिकोनातून आपण सुवर्णनियंत्रणाचा विचार करू. जुलै महिन्यात माजी अर्थमंत्र्यानी नभोवाणीवरून असे जाहीर केले होते की चोरट्या आयातीला आळा घालण्याचे आपले ध्येय सिद्धीस गेले आहे. याकरिता त्यानी परदेशी चलनात रुपयाची क्रयशक्ति वाढली आहे हे प्रमाण दिले. नियंत्रणाच्या सुरुवातीला थोडे दिवस अशी परिस्थिती होती तरी आता रुपयाची इतर परदेशी चलनातील क्रयशक्ति कमी होत आहे. वाढलेल्या क्रयशक्तीचा अर्थ चोरटी आयात कमी झाली असा होतो तर आता घसरणाऱ्या क्रयशक्तीचा अर्थ उलटा घ्यावा काय ? शिवाय मुख्यमुख्य जागतिक बाजारपेठातील सुवर्णाच्या किमतीत जे बदल झाले त्यावरूनही आपली चोरटी आयात कमी झाली म्हणून हे बदल झाले असा संबंध जोडून नियंत्रणाचे यश मोजण्यात आले. मात्र अर्थशास्त्रीय नियमाप्रमाणे हे तितकेसे संयुक्तिक ठरत नाही. कारण कुठल्याही वस्तूची किंमत अर्थशास्त्रीय नियमांप्रमाणे एकूण मागणी व पुरवठा यावरून ठरत असते. सुवर्णाच्या किमतीलाही अर्थात हाच नियम लागू आहे. भारतात

केली जाणारी चोरटी आयात ही एकूण जागतिक मागणीचा एक लहानसा घटक आहे. त्याचा संबंध जागतिक बाजारपेठेतील सुवर्णाच्या किमतीशी जोडण्यापूर्वी संपूर्ण जागतिक मागणी व जागतिक पुरवठा यांच्या इतर अनेक घटकांचा विचार करावा लागेल. त्याचप्रमाणे परदेशी चलनाच्या मागणीचा सोन्याच्या चोरट्या आयातीशी संबंध जोडण्यापूर्वीसुद्धा या गोष्टींशी निगडित असलेल्या इतर अनेक गोष्टींचा विचार करावा लागेल. याशिवाय आयात निर्यातीत झालेली सुधारणा किंवा सुवर्ण शुद्ध करण्याच्या कारखान्यात पसरलेली मंदी, यासारख्या गोष्टी नियंत्रणाच्या यशाचे गमक म्हणून बऱ्याच वेळा पुढे करण्यात येतात. पण त्यात फारच कमी तथ्य आहे असेच बहुधा आढळते.

देशातील सोन्याच्या किंमतीचा विचार केला तरी पुरावा सरकारविरोधी पक्षांच्या बाजूलाच झुकतो. नियंत्रणाच्या अगदी सुरुवातीला १० ग्रॅम सोन्याची किंमत ९७ रुपयापर्यंत उतरली होती, ती २२ जून-पर्यंत ११२ ते ११५ रुपयापर्यंत गेली. यावरून हेच सिद्ध होत नाही काय की किंमतीत झालेले स्वागतार्ह बदल हे फारच तात्पुरत्या स्वरूपाचे होते. कायम आणि टिकाऊ स्वरूपाचे फेरफार घडवून आणण्यात अद्यापि सरकारला यश आलेले नाही.

## यशाचा डळमळीत पुरावा

नियंत्रणवादी पक्ष मात्र या परिस्थितीचा हवातसा अर्थ लावतात. या किंमती चोरटी आयात कमी झाल्यामुळे वाढत आहेत हे थोडावेळ खरे मानले तरी आपले ध्येय सिद्धीस गेले असे मानता येणार नाही. आपल्याला मुख्य जे करावयाचे आहे ते म्हणजे भारतातील सोन्याच्या किंमती नि आंतरराष्ट्रीय किंमती यातील फरक शक्य तितका कमी करणे. त्याकरिता आपल्या किंमती खाली यावयास हव्या आहेत, नाहीतर बंद पडलेली चोरटी आयात सुरू व्हायला वेळ लागणार नाही. या सर्व गोष्टींचा विचार करता सुवर्णनियंत्रण यशस्वी झाले आहे असे म्हणणाऱ्यांच्या बाजूने फारसा भक्कम पुरावा आहे असे वाटत नाही. त्यांनी बांधलेला आशावादी बंगला अगदीच डगमगत्या पायावर आहे असेच आढळते!

## इतर देशातील सुवर्णनियंत्रण

आता आपण इतर देशातील सुवर्णनियंत्रणाची रूपरेखा पाहू. त्याच्यापुढचे प्रश्न काय होते व आज आहेत? त्यांनी ते कसे सोडविले किंवा सोडविण्याचा प्रयत्न चालविला आहे? त्यापासून आपल्याला काही बोध घेता येईल काय? त्यामुळे आपल्यापुढे पसरलेल्या अडचणींची गुंतागुंत सोडविण्यास बराच उपयोग होण्यासारखा आहे. रशियासारख्या हुकूमशाही राजवटीपासून तो अमेरिकेसारख्या लोकतंत्रवादी राज्यपद्धतीपर्यंत अनेक देशांना सुवर्णनियंत्रणाची कास धरावी लागलेली आहे. याचे कारण मुख्यतः आंतरराष्ट्रीय व्यापारात या माध्यमाला वादातीत महत्त्व आहे. सोन्याचा होता होईल तितका साठा करण्याकडे, तो जपून ठेवण्याकडे, नि त्यात भर घालण्याकडे, बहुतेक देशांची प्रवृत्ती असते. अमेरिकेचीच गोष्ट घ्या. तेथे. १०० डॉलरपेक्षा जास्त किंमतीचे सोने कुठल्याही अमेरिकन नागरिकाला परवान्याशिवाय जवळ बाळगता येत नाही. या संदर्भातील गुन्ह्याला शिक्षाही जबर आहे. १०,००० डॉलर दंड किंवा १० वर्षे सक्तमजुरी!! रशियात सोन्याच्या खाणी सरकारची मालमत्ता आहे, पण सहकारी संस्थाना सुवर्णोत्पादन करून ते सरकारला विकण्याची मुभा आहे. या देशात या क्षेत्रात काळाबाजार फोफावला आहे. चोरीचे प्रकार फार घडतात. अडते लोक खाणीवर जाऊन सोने विकत घेतात व ते नंतर काळ्याबाजारात सोनारांना नि दंतवैद्यांना विकतात. बेकायदेशीर सुवर्णसाठे जप्त करून सुद्धा त्यात काहीच फरक पडलेला नाही. आता रशियन








सरकारने शेवटचा उपाय योजला आहे. त्यायोगे गुन्हेगाराला मृत्यूची शिक्षा ठोठावण्यात येणार आहे! यावरून हेच सिद्ध होत नाही काय की सुवर्णासक्ति इतकी जबर आहे की हुकूमशाही राजवटीत सुद्धा गोष्टी या थराला जातात! मग आपल्यासारख्या देशात ही आसक्ती भगीरथ प्रयत्नांशिवाय कमी होणे शक्यच नाही. फ्रान्समध्ये सुद्धा १९५२ आणि फिरून १९५८ मध्ये खाजगी सुवर्णसाठे देशासाठी मिळविण्याचा प्रयत्न केला गेला; पण एकूण साठ्यांच्या दोन टक्क्याहून जास्त काही सरकार हस्तगत करू शकले नाही!

प्रगत देशातील सुवर्णनियंत्रणाची जर ही कथा तर मग भारतात—की जेथे सोन्याभोवती पिढ्यान् पिढ्या नि शतकानुशतके, अनेक कल्पना नि भावना रेंगाळत आहेत, रूढीचे अधिराज्य चालत आलेले आहे, चालीरीतींचे प्राबल्य आहे, जेथे आर्थिक हेतू नि सामाजिक रिवाज यांचा मजेशीर संगम झालेला आढळतो— आपल्याला या क्षेत्रात फारसे यश मिळाले नाही तर त्यात आश्चर्य वाटण्याजोगे विशेष काही नाही!

## अर्थव्यवस्थेवरील संभाव्य परिणाम

यशस्वी सुवर्णनियंत्रण ही फारशी सोपी गोष्ट नाही हे आपण पाहिलेच. पण थोड्या वेळापुरते आपण असे मानू की आपल्या देशात सुवर्णनियंत्रण यशस्वी झाले आहे. त्यामुळे आपल्या अर्थव्यवस्थेवर काय परिणाम होतील ते आपण आता पाहू. वर दिल्याप्रमाणे चोरट्या आयातीकरिता फार मोठ्या प्रमाणात परदेशी चलन लागत असे. सुवर्णनियंत्रणामुळे ही चोरटी आयात बंद पडली तर हेच परदेशी चलन इतर आयातींकरिता वापरता येईल. यातून उद्भवणाऱ्या दोनतीन संभाव्य गोष्टी पाहू. व्यापारीवर्ग या परदेशी चलनाचा साठा करून अन्य देशात गुंतवितील. पण आपल्या देशातील बऱ्याच बिकट कायद्यांमुळे हे तितकेसे सोपे आहे असे वाटत नाही. त्यापेक्षा परदेशी वस्तूंची आयात करणे त्यांना जास्त सुलभ वाटेल. एकूण अर्थव्यवस्थेवर या आयातीचा होणारा परिणाम ती आयात कुठल्या वस्तूंची आहे त्यावर अवलंबून राहील. ग्राहकोपयोगी वस्तूंची आयात वाढली तर भराभर वाढणाऱ्या किंमतीना आळा बसेल. त्यामुळे देशातील इतर उपलब्ध साधने दुसऱ्या गोष्टीकरिता वापरता येतील, ही 'जर-तारी' मनोराज्ये खरी ठरली तरच सुवर्णनियंत्रणाचा अर्थव्यवस्थेवर चांगला परिणाम होईल. पण या सर्व गोष्टी भारतीय अर्थव्यवस्थेत शक्य आहेत काय हाही एक प्रश्नच आहे! उलट आपण असे मानले की या परदेशी चलनाच्या साहाय्याने उत्पादनोपयोगी वस्तूंची आयात केली गेली तर या जादा भांडवलगुंतवणुकीमुळे राष्ट्रीय उत्पन्न वाढविण्यास मदत होईल. हे खरे असले तरी त्यात परत अनेक अडचणी आहेत. परदेशी चलनाची चणचण ही या अनेक अडचणींपकी एक आहे. अयोग्य सरकारी धोरणे, दिवसेदिवस वाढणारी महागाई, देशांतर्गत साधनांचा तुटवडा, या व अशा कितीक गोष्टी वर वर्णिलेले सुंदर चित्र प्रत्यक्षात उतरणे शक्य आहे काय, याविषयी आपल्याला साशंक करतात. पण समजा वर दिल्याप्रमाणे या परदेशी चलनात झालेल्या वाढीमुळे राष्ट्रीय उत्पन्नात खरोखर वाढ झाली तर काय काय परिणाम संभवतात ते पाहू. आपल्या देशातील एकूण परिस्थितीचा विचार करता पहिली गोष्ट यामुळे होईल ती म्हणजे एकूण मागणीत वाढ होईल. याला तोंड देण्यास पुरेसे राष्ट्रीय उत्पादन जोपर्यंत वाढत नाही तोपर्यंत किंमती वाढणारच. यावर एकच तोडगा आहे, तो म्हणजे राष्ट्रीय उत्पन्नाबरोबरच बचत सुद्धा वाढविणे. पण सध्याच्या परिस्थितीत हे फारसे शक्य वाटत नाही!



अनुक्रमणिका






## नियंत्रणातील एक संभाव्य धोका

दुसरी एक गोष्ट या संदर्भात संभवते ती अशी: आतापर्यंत सोन्यात पैसे गुंतविले म्हणजे ते अगदी सुरक्षित राहिले असे आपण मानत आलो. बहुसंख्य भारतीयांना सोने हे बचत गुंतविण्याचे सर्वांत चांगले साधन वाटते. सुवर्णनियंत्रण यशस्वी झाले तर बचत गुंतविण्याचे अन्य मार्ग शोधले जातील. खेड्यापाड्यातून धान्याचे साठे करण्याकडे नि शहरातून जमीन जुमल्यात किंवा शेअर्समध्ये पैसे गुंतविण्याची प्रवृत्ती वाढीस लागेल. असे घडून आले तर बाजारात येणाऱ्या एकूण मालात कपात होईल नि त्यामुळे किंमती जास्तच वाढतील. हे घडू नये म्हणून सरकारला फारच दक्षता घ्यावी लागेल. शिवाय आता सोन्याचे तारण ठेवून कर्ज मिळविण्याचा मार्ग शेतकऱ्यांना बंद झाल्यामुळे योग्य कर्जपुरवठा सरकारलाच करावा लागेल. नाहीतर खेड्यातून व्याजाचा दर भलतेच वाढून फारच त्रासदायक परिस्थिति निर्माण होईल! सोन्यात पूर्वी गुंतविली जाणारी बचत आता जर योग्यप्रकारे उपयोजिली गेली तर मात्र आपल्या नियोजनमार्गातील थोडासा त्रास कमी होण्याचा संभव आहे.

## भाववाढीवर नियंत्रण

वरील एकंदर विवेचनावरून एक गोष्ट स्पष्ट होते ती ही की आतापर्यंतचा आपला सुवर्णनियंत्रणाचा अनुभव फारसा आशादायक नाही नि नजीकच्या भविष्यकाळात तरी सुवर्णनियंत्रणाच्या यशस्वितेची काहीच खात्री देता येत नाही! देशातील सोन्याची किंमत नि आंतरराष्ट्रीय किंमत यातला फरक नाहीसा केल्याशिवाय सुवर्णनियंत्रण यशस्वी होणे शक्य नाही. सोन्याची वाढती किंमत ही देशातील एकंदर वाढत्या महागाईची नि भरमसाट वाढणाऱ्या किंमतीची द्योतक असल्यामुळे इतर सर्व गोष्टींकडे दुर्लक्ष करून फक्त सोन्याच्या किंमतीचाच विचार करता येणार नाही. शक्यतो सर्व किंमती स्थिर ठेवून किंमतवाढीला आळा घालणे हाच खरा रामबाण उपाय होय. आजवरचा आपला या बाबतीतला अनुभव मात्र उत्साहवर्धक नाही. आर्थिक विकास-कार्यक्रमावर खर्च करण्यात येणाऱ्या रकमामुळे लोकांच्या हातात खेळणाऱ्या पैशात दिवसेदिवस वाढ होतेच आहे. चिनी लोकांशी चाललेल्या सरहद्दीवरील युद्धामुळे यात भरच पडली आहे; आणि त्यामुळे किंमती स्थिर ठेवणे जवळजवळ अशक्यप्रायच होऊन बसले आहे!

## मनोरचनेतच बदल केल्यावाचून कायदा व्यर्थ

दुसरी एक कठीण गोष्ट म्हणजे पिढ्यान्‌पिढ्या भारतीय जनमनावर मोहिनी घालणाऱ्या सोन्याच्या मोहनास्त्रापासून भारतीयांची सुटका करणे! हे कार्य बिकट म्हणण्याचे कारण म्हणजे सामाजिक चालीरीति नि रिवाज यांच्याशी ही गोष्ट निगडित असल्यामुळे हे सर्व ताबडतोब बदलता येणे शक्य नाही! त्याकरिता मानसिक पार्श्वभूमी आधी तयार करावी लागेल. लोकानी सोने— १४ कॅरट सोनेसुद्धा- कमी वापरावे म्हणून त्यांची मने वळवावी लागतील. हे शक्य झाले तर मागणी कमी झाल्यामुळे किंमती कमी होतील. चोरटी आयात करणाऱ्यांच्या नफ्यात घट झाल्यामुळे त्यालाही आळा बसेल. पण हे जर शक्य झाले नाही तर मात्र यशाची आशा धरावयास नको! नुसते कायदे करून हा प्रश्न सुटणार नाही. त्याकरिता समाजात वैचारिक जागृति व्हावयास हवी आहे. पण दुर्दैवाची गोष्ट अशी की कायदा येण्यापूर्वीच लोकमत त्या बाजूला वळविण्याचे जे कार्य व्हावयास हवे होते ते झालेले नाही. सुवर्णनियंत्रण जारी झाल्याबरोबर लोकात जी दागिने विकत घेण्याची स्पर्धाच लागली होती ती आपल्या देशातील मानसिक नि सामाजिक वातावरण या कायद्याच्या अंमलबजावणीला पोषक नाही हेच दर्शवीत नाही काय? अजूनही वेळ गेलेली नाही. प्रयत्न मात्र शिकस्तीने करावे लागतील.



अनुक्रमणिका






जनतेला सुवर्णनियंत्रणामागची भूमिका समजावून द्यावी लागेल. त्यापासून होणाऱ्या फायद्यांचे दृश्य त्यांच्या नजरेसमोर रेखाटून त्यांना कायद्याप्रमाणे वागावयास प्रवृत्त करावे लागेल. कारण शेवटी लोकांच्या सहकार्यावरच कायद्याची यशस्विता अवलंबून आहे. हे जर जमले नाही तर आतापर्यंतच्या इतर नियंत्रणासारखीच या नियंत्रणाचीही दशा होण्यास वेळ लागणार नाही. हे काम विकट आहे यात शंका नाही. पण सुरुवातीला वाटते तितके मात्र ते जिकीरीचे खास नाही. सामाजिक चालीरीतीशी हा प्रश्न निगडित असल्यामुळे उलट काही अंशी हे लोकमत अनुकूल करून घेण्याचे कार्य सुलभ होते. सोने लोक वापरतात याचे कारण समाजातील श्रीमंतीगरिबीच्या कल्पना, मानापमान, या सगळ्याशी ते निगडित आहे म्हणून. प्रत्येकजण विकत घेतो कारण सगळे विकत घेतात ! जर सर्वांनीच सोने वापरावयाचे नाही असे ठरविले तर कोणीच घेणार नाही ! समाजातील मान्यवर लोक, पुढारी वगैरेंनी सोन्यावर बहिष्कार टाकला तर त्याच्या पावलावर पाऊल टाकण्यात धन्यता मानणारे बहुसंख्य लोक तोच कित्ता गिरवितील यात शंका नाही.

## बचत गुंतविण्याचे लाभदायक मार्ग

जनमत अनुकूल करून घेत असतानाच आणखी एक गोष्ट होणे आवश्यक आहे. सोने हे आपल्याकडे बचत गुंतविण्याचे सर्वांत चांगले साधन समजले जाई हे आपण पाहिलेच आहे. नियंत्रण यशस्वी व्हावयास हवे असेल तर लोकांना इतरही अनेक बचतगुंतवणुकीचे मार्ग उपलब्ध आहेत हे दाखवावे लागेल. खेड्यापाड्यातून तशा सोयी कराव्या लागतील. अशा प्रकारच्या अन्य बचतगुंतवणुकीत उत्पन्न पण मिळू शकते हे दाखवावे लागेल. हे शक्य झाले तर सोन्याच्या हव्यासामागचे एक कारण नाहीसे करण्यात आपल्याला यश आले असे मानण्यास हरकत नाही.

इतके दिवस दुर्लक्षिली गेलेली आणखी एक गोष्ट आता व्हावयास हवी आहे. ती म्हणजे सुवर्णनियंत्रणाशी निगडित असलेल्या सर्व मूलभूत प्रश्नांचा सखोल अभ्यास झाला पाहिजे. तोसुद्धा शक्य तितक्या लवकर ! कोट्यवधी लोकांना सोन्यासाठी जीव टाकण्यास प्रवृत्त करणारी अशी कोणती मोहिनी यात आहे ? याला काही आर्थिक हेतूंचा आधार आहे काय ? की हा नुसताच सामाजिक नि मानसिक प्रश्न आहे ? या सर्व गोष्टींचे विश्लेषण व्हावयास हवे आहे. आजपर्यंत फक्त रिझर्व्ह बँकेने १९५८ मध्ये आपल्या देशातील सुवर्णसाठ्याची माहिती देण्यासाठी प्रसिद्ध केलेल्या एका पुस्तिकेशिवाय दुसरी अधिकृत माहिती या संदर्भात उपलब्ध नाही. त्यामुळेच सुवर्णनियंत्रणकायदासुद्धा पुरेसा पूर्वतयारीशिवाय नि विश्वसनीय माहितीशिवाय जारी करण्यात आला असे अनेकदा बोलले जाताना आपण ऐकतो ! हे सर्व लवकरात लवकर सुधारावे लागेल. सुवर्णनियंत्रण हे सर्व सरकारी धोरणापासून वेगळे नसून इतर सर्व धोरणाशी संबंधित आहे, हे ध्यानात ठेवून तशीच योजनाबद्ध आखणी करून जर कार्यास सुरुवात केली तरी अर्धी लढाई जिंकली असे म्हणावयास हरकत नाही. भावी यशाची ती नांदीच ठरेल. मात्र अंतिम ध्येयपूर्तीसाठी आकाशगंगेचा ओघ वळविताना करावे लागले त्याहूनही शतपटीने अधिक प्रयत्न या सुवर्णगंगेचा ओघ वळविण्यासाठी करावे लागतील हे सांगणे नलगे.










श्री. अद्वयानंद गळतगे

# जीवाची उत्पत्ति : २ :

मागच्या लेखात जीवाच्या उत्पत्तीचा प्रश्न ज्या निरनिराळ्या दृष्टिकोनातून सोडविण्याचा आजपर्यंत प्रयत्न झाला आहे त्या दृष्टिकोनांचा विचार केला असून त्याबाबतची शास्त्रीय भूमिका काय आहे हे स्पष्ट केले आहे. ही शास्त्रीय भूमिका मांडताना उत्क्रांतिवादाचीच कास धरणे कसे क्रमप्राप्त आहे हेही स्पष्ट केले आहे. या उत्क्रांतिवादी दृष्टिकोनानुसार पृथ्वीच्या उत्क्रांति- इतिहासात अशी एक अवस्था होऊन गेली की जेव्हा जड पदार्थामधील चलनवलन जिवंत पदार्थामधील चलनवलनामध्ये रूपांतरित झाले.* म्हणजेच जड पदार्थामधील चलनवलन अधिक गुंतागुंतीचे झाले. ही गुंतागुंत निश्चित कशी निमाण झाली हे पृथ्वीवरील प्रारंभिक परिस्थितीच्या अभ्यासावरून समजून घेणे आता अगत्याचे आहे. यासाठी खगोल व भूशास्त्रांच्या अभ्यासाची गरज असली तरी जीवरसायनशास्त्राच्या अभ्यासापासून मिळालेल्या माहितीचा या कामी जास्त उपयोग होतो असे आढळून येते. कारण या अभ्यासापासून प्राथमिक जीवासंबंधी आणि पर्यायाने प्रारंभिकपृथ्वीवरील परिस्थितीसंबंधी अत्यंत महत्त्वाची अशी माहिती मिळाली आहे, अर्थात् ती खगोल व भूशास्त्रांच्या अभ्यासापासून मिळणाऱ्या माहितीशी सुसंगत ठरली पाहिजे हे उघड आहे. हे आपणाला पुढे पहावयाचेच आहे.

## प्रारंभिक जीवाचे स्वरूप

जीवरासायनिक प्रक्रियांच्या अभ्यासापासून प्रारंभिक जीवाविषयी दोन महत्त्वाच्या गोष्टी माहीत झाल्या आहेत. पहिली गोष्ट म्हणजे प्रारंभिक जीव तयार अन्नावर जगत होते. म्हणजे त्याना स्वतःचे अन्न तयार करता येत नव्हते. अशा जीवाना परान्नभोजी ( heterotrophic ) जीव म्हणतात. अशाप्रकारे पृथ्वीवरील पहिले जीव परान्नभोजी होते. दुसरी गोष्ट म्हणजे या प्रारंभिक जीवाना जगण्यासाठी आक्सीजनची गरज नव्हती. ते तयार सद्रिय पदार्थापासून ऑक्सीजनखेरीज–ज्वलनाखेरीज–शक्ती निर्माण करीत होते. दुसऱ्या शब्दात सांगावयाचे म्हणजे पहिले जीव श्वासोच्छ्वास क्रिया ( respiration ) करीत नसून आंबवण–क्रिया ( fermentation ) करीत होते.

पृथ्वीवरील पहिले जीव परान्नभोजी होते ही गोष्ट तयार अन्नाचे ग्रहण आणि उपयोग करण्याची जीवरासायनिक यंत्रणा सर्व जातींच्या जीवपेशीमध्ये आढळून येते यावरून सिद्ध होते. हल्ली वनस्पती व रसायन ( chemosynthetic ) बॅक्टेरिया ह्याखेरीज बाकीचे सर्व जीव अन्नाच्या दृष्टीने परावलंबी आहेत. हे सर्व जीव एका अर्थाने वनस्पतीवरच जगत असतात. कारण स्वतःचे अन्न स्वतः तयार करण्याचे सामर्थ्य फक्त वनस्पतीमध्येच असून त्या हे

* जड पदार्थ आणि जिवंत पदार्थ यांच्यामध्ये फरक करावयाचा झाल्यास तो पदार्थाच्या चलनवलनाच्या स्वरूपाच्या दृष्टीनेच केला पाहिजे. कोणत्याही गूढ 'जीवशक्ती' च्या दृष्टीने किंवा दैवी शक्तीच्या हस्तक्षेपाच्या दृष्टीने करता कामा नये– हा उत्क्रांतिप्रक्रियेच्या अभ्यासापासून निघणारा निष्कर्ष आहे. उत्क्रांतिप्रक्रियेच्या अभ्यासामुळे 'जीवशक्ती'ची अनवश्यकता आता सिद्ध झाली आहे. आणि म्हणून 'जीवशक्ती'ची कल्पना उत्क्रांतिप्रक्रियेच्या अज्ञानातून जन्मली होती असे म्हणता येईल. या दृष्टीने 'जीवशक्ती' चे समर्थन करण्याचा जीवशास्त्रातील हल्लीच्या काही लोकांचा प्रयत्न पूर्वीच्या alchemy ( किमया ) या नावाच्या शास्त्रातील हिणकस धातूपासून सोने बनविण्याच्या शास्त्रज्ञांच्या प्रयत्नाशी ताडून पाहण्यासारखा आहे. हिणकस धातूपासून सोने बनविण्याचा प्रयत्न भौतशास्त्रातील नियमांच्या अज्ञानातून जन्मला होता. प्रायोगिक रसायनशास्त्रात प्रगति झाल्यानंतर या किमया विद्येचे थोतांड उघड झाले. हीच गोष्ट हल्ली जीवशास्त्रात घडून आली असून प्रायोगिक जीवशास्त्रात प्रगति झाल्यामुळे 'जीवशक्ती' मधील थोतांड उघड झाले आहे.









अनुक्रमणिका

कार्य पानातील हरितद्रव्याच्या सहाय्याने सूर्यप्रकाशातील शक्तीचा उपयोग करून करीत असतात. वनस्पती स्वतःचे अन्न स्वतःच तयार करू शकत असल्याने आणि इतर जीवाना अन्न पुरविण्यास केवळ त्याच समर्थ असल्याने वनस्पतीच पृथ्वीवर प्रथम निर्माण झाल्या असाव्यात असा एक तर्क पूर्वी रचण्यात आला होता. ( काहीजण उपर्युक्त रसायन-बॅक्टेरियाच प्रथम पृथ्वीवर निर्माण झाले असावेत असे मानत होते. कारण हे बॅक्टेरियासुद्धा वनस्पतीप्रमाणे आपले अन्न स्वतःच तयार करू शकतात. फरक इतकाच की वनस्पतीप्रमाणे सूर्यप्रकाशापासून मिळणाऱ्या शक्तीचा ह्या कामी उपयोग करण्याऐवजी खनिज पदार्थांच्या ज्वलनापासून मिळणाऱ्या शक्तीचा ते उपयोग करितात. ) एक तर वनस्पतीखेरीज सेंद्रिय पदार्थ ( अन्न ) तयार होऊच शकत नाहीत, या चुकीच्या कल्पनेवर हे सिद्धांत आधारले आहेत. (भौतिक घटकानी सेंद्रिय पदार्थ निमाण होऊ शकतात हे आता सिद्ध झाले आहे. ) दुसरे असे की वनस्पतीची हरितद्रव्ययुक्त पेशी ( किंवा उपर्युक्त बॅक्टेरिया ) इतकी गुंतागुंतीची आणि उच्च संघटनेने युक्त आहे की ती पृथ्वीवर प्रथम कशी निर्माण झाली या प्रश्नाला समाधानकारक उत्तर या लोकांजवळ नाही.

तिसरी आणि सर्वात महत्वाची गोष्ट अशी की वनस्पतीमध्ये आढळून येणारी स्वान्नभोजी जीवरासायनिक यंत्रणा प्राण्यामध्ये आढळून येत नाही. हे लोक म्हणतात त्याप्रमाणे वनस्पती अगोदर निर्माण झाल्या असतील व त्यांच्यापासून प्राण्यांची उत्क्रांति झाली असेल तर वनस्पतीमधील स्वान्नभोजी यंत्रणा किंवा निदान काही एंझाइम्स प्राण्यात आढळून आली पाहिजेत. पण ती आढळून येत नाहीत. वनस्पतीमधील स्वान्नभोजी यंत्रणा प्राण्यात आढळून येत नसली तरी प्राण्यातील परान्नभोजी यंत्रणा मात्र वनस्पतीमध्ये आढळून येते. यावरून प्राण्यातील परान्नभोजी यंत्रणा ( heterotrophic mechanism ) उत्क्रांति-अवस्थेत अगोदरची असून वनस्पतीमधील स्वान्नभोजी यंत्रणा ( autotrophic mechanism ) नंतरची आहे असे ठरते. ही गोष्ट हरितद्रव्ययुक्त बॅक्टेरियामधील स्वान्नभोजी यंत्रणा नष्ट केली तर ते जीव परान्नभोजी यंत्रणेच्या सहाय्याने जगतात या वस्तुस्थितीवरून उघड होते. इतकेच नव्हे तर उत्क्रांतीच्या वरच्या अवस्थेला पोचलेल्या आणि हवे ते सेंद्रिय पदार्थ स्वतः तयार करू शकणाऱ्या वनस्पतीनासुद्धा, त्यांचे भाग पेशीजालाच्या जोपासना – ( tissue culture ) पद्धतीने वाढविले असता तयार अन्नाची आवश्यकता असते व ते त्या ग्रहण करून वाढू शकतात असे आढळून येते. यावरून तयार अन्न ग्रहण करण्याची आणि ते उपयोग करण्याची ( परान्नभोजी ) यंत्रणा प्राचीन असून तिच्यावर कालांतराने स्वान्नभोजी यंत्रणा उत्क्रांत होऊन 'आरूढ' झाली आहे असे ठरते. अशा रीतीने पृथ्वीवरील प्रारंभिक जीव परान्नभोजी होते हा जीवरसायनशास्त्राचा निष्कर्ष अबाधित राहतो.

जीवरासायनिक प्रक्रियांच्या अभ्यासापासून काढलेला दुसरा महत्वाचा निष्कर्ष म्हणजे पृथ्वीवरील प्रारंभिक जीव ऑक्सिजनखेरीज जगू शकत होते. प्रथमदर्शनी ही गोष्ट विलक्षण वाटते. कारण जगण्यासाठी सामान्यतः सर्व जीवांना ऑक्सिजनची गरज असल्याचे आढळून येते. ( म्हणून ऑक्सिजनला प्राणवायु म्हटले आहे. ) काही थोडे जीव ऑक्सिजनखेरीज जगू शकतात हे खरे असले तरी त्यांची संख्या अत्यल्प असून ऑक्सिजनचा उपयोग करणाऱ्यांची संख्या प्रचंड आहे ही वस्तुस्थिति आहे. तथापि हे जीव ऑक्सिजनचा उपयोग करण्यास अलीकडेच -- पृथ्वीच्या उत्क्रांतीच्या कालावधीच्या मानाने 'अलीकडे' -- शिकले आहेत असे आढळून येते. कारण या जीवातील ऑक्सिजनच्या सहाय्याने सेंद्रिय पदार्थांचे विघटन घडवून आणणारी यंत्रणा ( respiration ) अभ्यासली तर ती ऑक्सिजनखेरीज त्यांचे विघटन घडवून आणणाऱ्या यंत्रणे-( anaerobiosis ) वर आधारली असल्याचे आढळून येते. ऑक्सिजनखेरीज सेंद्रिय पदार्थांचे विघटन घडवून आणणाऱ्या या यंत्रणेला आंबवण यंत्रणा ( fermentation ) म्हणतात. ही प्रक्रिया शर्करेपासून अल्कोहोल तयार करणाऱ्या यीस्ट नावाच्या एकपेशीय जीवात विशेष प्रकर्षाने चालत असते. ही आंबवण यंत्रणा बॅक्टेरियापासून मानवापर्यंत सर्व जीवामध्ये आढळून आली आहे. ऑक्सिजनचा उपयोग करू शकणारे जीव ऑक्सिजनचा अभाव








असेल तेव्हा आंबवण प्रक्रियेने शक्ति निर्माण करून जगत असल्याचे आढळून येतात. उदा० वनस्पतींना ऑक्सिजन नसलेल्या वातावरणात वाढविले असता आंबवण प्रक्रिया कार्यान्वित होते. प्राण्यांच्या मेंदूंच्या गर्भावस्थेतील वाढ बहुतांशी संपूर्णपणे ऑक्सिजनच्या अभावी चालते. गर्भाच्या नंतरच्या अवस्थेत मात्र श्वासोच्छ्वसन यंत्रणा कार्यान्वित होते, ही गोष्ट सूचक आहे. कारण प्रत्यक्ष उत्क्रांतीच्या सर्व अवस्था गर्भावस्थेत संक्षेपाने दिसून येत असल्याने ( Recapitulation ) सेंद्रिय पदार्थांपासून शक्ति निर्माण करणाऱ्या यंत्रणेची कशी उत्क्रांति झाली हे यावरून स्पष्ट होते. आंबवण प्रक्रियेपासून श्वासोच्छ्वसन-प्रक्रियेमध्ये झालेल्या गर्भावस्थेतील स्थित्यंतरावरून आंबवण यंत्रणा अगोदरची असून श्वासोच्छ्वसन-यंत्रणा नंतरची आहे आणि ती आंबवण यंत्रणेवर 'आरूढ' झाली आहे ही गोष्ट स्पष्ट होते. अर्थात श्वासोच्छ्वसन यंत्रणा जीवनझगड्यात जीवांना उपयुक्त ठरल्यामुळेच उत्क्रांत झाली आहे हे उघड आहे. ही यंत्रणा जीवाना सेंद्रिय पदार्थांपासून जास्तीत जास्त शक्ति मिळविण्यास मदत करते हीच तिची उपयुक्तता होय. उलट आंबवण प्रक्रियेने मिळणारी शक्ति तुलनेने कमी असते. कारण आंबवण प्रक्रियेचा परिणाम म्हणून अल्कोहोल, लॅक्टिक ॲसिड इ. त्या जीवाना निरुपयोगी असे पदार्थ निर्माण होतात. पण श्वासोच्छ्वास करणारे जीव या पदार्थांचेसुद्धा विघटन घडवून आणीत असल्यामुळे त्याना आंबवणाऱ्या जीवापेक्षा जास्त प्रमाणात शक्ति मिळते. ( श्वासोच्छ्वसन प्रक्रियेचा परिणाम म्हणून बाष्प आणि कार्बनडायॉक्साईड वायु हे अधिक विघटन घडवून आणण्यास अशक्य असलेले घटक तयार होतात. )

## खगोल आणि भूरसायनशास्त्रापासून आधार

अशा रीतीने पृथ्वीवरील प्रारंभिक जीव तयार सेंद्रिय पदार्थांवर जगत होते व आपणाला जगण्यासाठी लागणारी शक्ति ते हे पदार्थ आंबवून– म्हणजे ऑक्सीजनखेरीज निर्माण करीत होते, या प्राथमिक जीवासंबंधीच्या दोन मूलभूत गोष्टी आपणास जीवरासायनिक प्रक्रियांच्या अभ्यासापासून माहीत होतात. जीवरासायनिक अभ्यासापासून निघणाऱ्या या निष्कर्षांना खगोल, भू व भूरसायन शास्त्रापासूनही पुष्टी मिळाली आहे. पृथ्वीच्या निर्मितीसंबंधीच्या आधुनिक खगोलशास्त्रीय सिद्धांतानुसार पृथ्वीवरील प्रारंभिक वातावरणात ऑक्सीजनचा संपूर्ण अभाव असून ते वातावरण अमोनिया, मिथेन, हायड्रोजन आणि बाष्प यानी युक्त होते. गुरु, शनि या ( व त्यांच्या उप- ) ग्रहावरील वातावरण हल्लीसुद्धा मिथेन, अमोनिया, या वायूनी बनले असल्याचे आढळून येते. पण अशा रीतीने जर पृथ्वीवरील प्रारंभिक वातावरणात ऑक्सीजन नव्हता तर पृथ्वीवरील हल्लीचा ऑक्सीजन आला कोठून, असा प्रश्न निर्माण होतो. पृथ्वीवरील वातावरणातील हल्लीचा ऑक्सीजन वनस्पतीमुळे निर्माण झाला असल्याचे आता सर्वमान्य झाले आहे. हा ऑक्सीजन सुमारे ७० ते ८० कोटी वर्षांपूर्वी निर्माण झाला असला पाहिजे असा निष्कर्ष थोड, मॅक्नामारा इ. शास्त्रज्ञानी पृथ्वीवरील गंधक आयसोटोपच्या विभागणीच्या अभ्यासावरून काढला आहे. अशा रीतीने ऑक्सीजनचा शक्तिनिर्मितीसाठी उपयोग करणारे जीव वनस्पतीनी वातावरणात ऑक्सीजन सोडल्यानंतर, म्हणजे सुमारे ७० ते ८० कोटि वर्षांपूर्वी, निर्माण झाले आहेत असे ठरते. तोपर्यंत पृथ्वीवरील जीव आंबवण–प्रक्रियेने जगत होते असे ठरते. पण आंबवण प्रक्रिया सेंद्रिय पदार्थ तयार स्वरूपात मिळाले तरच शक्य आहे. उदा० यीस्ट हे आंबवणारे जीव तयार शर्करा पुरविली तरच जगू शकतात. अशा रीतीने पृथ्वीवरील पहिले जीव आंबवत होते इतकेच नव्हे तर ते तयार अन्नावर जगत होते–म्हणजे परान्नभोजी होते–असे ठरते. अशा रीतीने जीवरासायनिक प्रक्रियांच्या अभ्यासापासून काढलेल्या निष्कर्षांला खगोल व भूरसायनशास्त्रांच्या अभ्यासापासून निघणारा निष्कर्ष अनुकूल आणि पुष्टीदायकच ठरतो.

अशा रीतीने पृथ्वीवरील प्रारंभिक जीव तयार सेंद्रिय पदार्थांवर जगत असतील तर हे सेंद्रिय पदार्थ मुळात तयार कसे झाले, असा एक महत्त्वाचा प्रश्न निर्माण होतो. हल्ली पृथ्वीवर आढळून येणारे सर्व सेंद्रिय पदार्थ जैविक प्रक्रियांनी–जीवापासूनच निर्माण झाले आहेत. ( म्हणूनच त्याना सेंद्रिय हे नाव मिळाले आहे. ) पृथ्वीवरील पहिल्या जीवाना हे सेंद्रिय पदार्थ तयार स्वरूपात मिळाले असतील तर

ते जीवपेशीबाहेर म्हणजे अजैविक ( भौतिक ) प्रक्रियानी निर्माण झाले असले पाहिजेत हे उघड आहे. सेंद्रिय पदार्थ ( शर्करा, अमिनो ॲसिडे, प्रोटीन इ. बहुभागी व भारी संयुगे ) अजैविक प्रक्रियानी निर्माण होऊ शकल्याचे प्रयोगाने दाखवून देता आले तर जीवाच्या उत्पत्तीचा प्रश्न सोडविण्यातील एक मोठी अडचण नाहीशी होते.

## सेंद्रिय पदार्थांची अजैविक निर्मिति

जीवपेशीमध्ये कार्बन ( C ), हायड्रोजन ( H ), ऑक्सीजन ( O ), आणि नायट्रोजन ( N ) ही मुख्य मूलद्रव्ये आढळून येतात. या गोष्टीचा पूर्वी उल्लेख आलाच आहे. प्रोटीनमध्ये ही सर्व मूल्ये आढळून येत असल्यामुळे प्रोटीन हे जीवाचे लक्षण मानले गेले आहे. शर्करा व पिष्टमय पदार्थ यामध्ये मात्र N चा अभाव आढळून येतो म्हणजे त्यामध्ये फक्त CHO हे अणु आढळून येतात. हायड्रोकार्बनमध्ये N शिवाय O चाही अभाव आढळून येतो. म्हणजे त्यामध्ये फक्त CH हे अणु आढळून येतात. मिथेन हा वायु हायड्रोकार्बनमध्ये मोडत असून त्याचे सूत्र $CH_4$ आहे. हा वायु पृथ्वीवरील प्रारंभिक वातावरणातील एक मुख्य घटक होता हे मागे सांगितलेच आहे. पृथ्वीवरील प्रारंभिक वातावरणात O चा अभाव असला तरी बाष्प ( $H_2O$ ) च्या स्वरूपात तो उपलब्ध होता. $CH_4$ खेरीज इतरही हायड्रोकार्बने ($C_2H_2$, $C_2H_4$ इ.) धातू-कार्बाईडवर बाष्प-प्रक्रिया होऊन निर्माण झाली असली पाहिजेत हे विख्यात रशियन शास्त्रज्ञ ओपॅरिन यानी दाखवून दिले आहे. या हायड्रोकार्बनांची बाष्पशी प्रतिक्रिया होऊन ( विद्युत्शक्तीने ) CHO स्वरूपाची संयुगे तयार झाली असली पाहिजेत. अशा स्वरूपात तयार होणाऱ्या अनेक संयुगापैकी फॉर्मॉल्डीहाईड ( $CH_2O$ ) हे एक संयुग आढळून येते. ही $CH_2O$ ची संयुगे चुन्याच्या पाण्यात काही काळ ठेविली असता त्यापासून शर्करा ( $C_6H_{12}O_6$ ) बनत असल्याचे प्रयोगांती आढळून आले आहे. चुन्याचे अणु वेगवर्धक ( catalyst ) म्हणून काम करीत असल्यामुळेच अर्थात् हे शक्य होते. अशा वेगवर्धकामुळे एरवी अशक्य असलेल्या किंवा अत्यंत मंद गतीने चालणाऱ्या प्रतिक्रिया मोठ्या प्रमाणावर शक्य होत असल्याने सेंद्रिय पदार्थांच्या निर्मितीमध्ये त्यांचा फार मोठा वाटा आहे.

पण पृथ्वीवरील प्रारंभिक वातावरणात यापेक्षाही मोठा वाटा अल्ट्राव्हायोलेट किरणे, विद्युच्छक्ति, किरणोत्सर्ग इत्यादींनी उचलला असला पाहिजे असे प्रयोगांती आढळून येते. कारण या शक्तीमुळे एरवी अशक्य असलेल्या रासायनिक प्रतिक्रिया – शक्तिरूपी भिंत (energy barrier ) ओलांडली गेल्यामुळे – सहजसाध्य बनतात. उदा० $H_2$ आणि $CO_2$ हे ( एरवी संयोग न पावणारे ) अल्ट्राव्हायोलेट किरणांच्या माऱ्यामुळे $CH_2O$ मध्ये रूपांतरित होत असल्याचे आढळून येतात. विद्युच्छक्तीमुळेही या प्रतिक्रिया घडून येत असून शिवाय $CH_2O$ चे पुढे पिष्टमय पदार्थामध्येही रूपांतर होत असल्याचे आढळून येते. प्रारणामुळेही या प्रतिक्रिया घडून येतात.

ज्या ॲमिनो ॲसिडपासून प्रोटीन बनते ती ॲमिनो ॲसिडेसुद्धा या शक्तीच्या सहाय्याने तयार होऊ शकतात असे आढळून आले आहे. ( सर्वांत सोपे ॲमिनो ॲसिड ग्लायसीन असून त्याचे सूत्र $CH_2 \cdot NH_2$ COOH असे आहे. ) मागे उल्लेख केल्याप्रमाणे पृथ्वीवरील प्रारंभिक वातावरणात मिथेन ( $CH_4$ ), अमोनिया ( $NH_3$ ), हायड्रोजन, आणि बाष्प ( $H_2O$ ), हे घटक होते. प्रारंभिक पृथ्वीवरील हे वातावरण कृत्रिमपणे प्रयोगशाळेत निर्माण करून उपर्युक्त शक्तींचा उपयोग केला असता बरेच सेंद्रिय पदार्थ निर्माण होत असलाचे आढळून आले आहे. उदा० एस्. एल्. मिलर यानी या वायूंच्या मिश्रणामध्ये विद्युत्प्रवाह खेळविला असता त्याना त्यामध्ये ग्लायसीन, अलानीन, सॅर्कोसिन व इतर अनेक अमिनो ॲसिडे निर्माण झाल्याचे आढळून आले. पृथ्वीवरील प्रारंभिक वातावरणात ( आताच्या प्रमाणे ) नैसर्गिक विद्युत्पात होत असले पाहिजेत ) व मिलर यांच्या प्रयोगात निर्माण झाली तशी अमिनो ॲसिडे निर्माण होत असली पाहिजेत हे यावरून उघड आहे.

वरील प्रयोगातील मिथेनऐवजी CO व अमोनियाऐवजी नायट्रोजन ( हे वायु ज्वालामुखीमुळे प्रारंभिक पृथ्वीवर निर्माण झाले असले पाहिजेत. ) यांचे मिश्रण वापरले असतानासुद्धा मिलर यांच्या प्रयोगात








आढळली तशी अमिनो ॲसिडे निर्माण झाल्याचे कार्नेजी इन्स्टिट्युटच्या पी. एच्. अबेल्सनना आढळून आले. अमोनियम असिटेटच्या द्रावणावर प्रारणाचा मारा केल्यानंतरही अशाच प्रकारची अमिनो ॲसिडे निर्माण झाल्याचे आढळून आले आहे.

### भारी रेणूंची निर्मिति आणि त्यांचे केंद्रीकरण

विद्युत्पात आणि किरणोत्सर्ग (प्रारण) यापासून पृथ्वीला मिळणारी शक्ति मर्यादित आहे. सूर्यप्रकाशाचे मात्र तसे नाही. सूर्यप्रकाशाच्या शक्तीचे प्रमाण इतर शक्तिस्रोताहून बरेच मोठे असल्याने तिचा सेंद्रिय पदार्थांच्या निर्मितीमध्ये बराच मोठा वाटा असला पाहिजे. म्हणून हाल्डेन, बेक्वीरल इ. शास्त्रज्ञानी शक्तिस्रोताला सेंद्रिय पदार्थांच्या निर्मितीच्या संदर्भात विशेष महत्व दिले आहे. पण याबतीत प्रत्यक्ष प्रयोग करणाऱ्यांची संख्या फार थोडी असून त्यामध्ये भारताचे डॉ. कृष्ण बाहदूर आणि डा. सौ. रंगनायकी यांचा प्रामुख्याने उल्लेख केला पाहिजे. फॉर्मॅल्डीहाईड आणि पोटॅशियम नायट्रेट यांच्या मिश्रणात आयर्न क्लोराईड हे वेगवर्धक घालून त मिश्रण ८० तास सूर्यप्रकाशात ठेवल्यानंतर या शास्त्रज्ञांना दहा प्रकारची अमिनो ॲसिडे निर्माण झाल्याचे आढळून आले. गेल्या मे महिन्यात हे शास्त्रज्ञ या अमिनो असिडपासून सूर्यप्रकाशाच्या सहाय्याने प्रोटीन आणि प्रोटीनच्या धर्तीची संयुगे निर्माण करण्यात यशस्वी झाल्याचे प्रसिद्ध झाले आहे. जपानी शास्त्रज्ञ अकाबोरी हे केऑलीन ($Al_2O_3$) या चिकणमातीचा वेगवर्धकासाठी उपयोग करून प्रोटीन आणि प्रोटीन-सदृश लांब साखळीचे भारी रेणू तयार करण्यात पूर्वीच यशस्वी झाले होते. गेल्या वर्षी अमेरिकेच्या सिड्ने फॉक्स यानी पृथ्वीवरील प्रारंभिक अवस्थेत प्रोटीनसारखे रेणू निर्माण होण्याची शक्यता सप्रयोग दाखवून दिली होती. या सर्व शास्त्रज्ञांच्या प्रयोगामुळे पृथ्वीवरील प्रारंभिक समुद्रात प्रोटीनसदृश भारी रेणू (Protein-like polymers of high molecular weight) भौतरासायनिक नियमानी निर्माण झाले असल्याच्या कल्पनेला दुजोरा मिळतो. मात्र या प्रोटीननिर्मितीची पद्धति हल्लीच्या जीवपेशीतील प्रोटीन-निर्मितीच्या पद्धतीप्रमाणे स्थलकालामध्ये नियमित झाली नव्हती हे लक्षात ठेवले पाहिजे. हल्ली जीवपेशीतील जीवरासायनिक संघटनेमुळे पेशीतील प्रोटीनच्या व इतर सेंद्रिय पदार्थांच्या निर्मितीला काटेकोरपणा आला आहे. पृथ्वीवरील प्रारंभिक समुद्रात या संघटनेचा अभाव असल्याने प्रोटीन व इतर सेंद्रिय पदार्थांची निर्मिती अशा काटेकोररीतीने होत नव्हती. म्हणजे त्यावेळी प्रोटीन रेणूंची रचना (structure) आणि कार्य (function) यामध्ये मेळ साधला नव्हता. हा मेळ साधावयाचा झाल्यास प्रोटीन निर्मितीच्या यंत्रणेमध्ये सुसंघटितपणा आला पाहिजे. ही संघटित अवस्था हल्लीच्या जीवपेशीत असल्यामुळे तिच्यामध्ये विशिष्ट कार्यासाठी विशिष्ट रचनेचे प्रोटीन तयार होतात. म्हणजेच प्रोटीन रेणूंची रचना व त्यांचे कार्य यांच्यामध्ये हल्लीच्या जीवपेशीत मेळ साधला आहे. समाजातील निरनिराळ्या व्यक्तींना त्यांच्या बुद्धिमत्तेप्रमाणे समाजात कामे मिळाली तरी तो समाज ज्याप्रमाणे सुसंघटित म्हणता येईल त्याचप्रमाणे विशिष्ट रचनेच्या प्रोटीन रेणूंना त्यांच्या रचनेला जुळणारी कामे पेशीत मिळाली तर ती पेशी (रेणुव्यवस्था) संघटित म्हणता येईल. प्रारंभिक समुद्रातील सेंद्रिय पदार्थांच्या निर्मितीची यंत्रणा प्राचीन समाजाप्रमाणे असंघटित होती. हल्लीची संघटित जीवपेशी (हल्लीच्या समाजाप्रमाणे) या अगोदरच्या असंघटित अवस्थेपासून हळूहळू उत्क्रांत झाली असून तिची परिणति हल्लीच्या 'सहेतुक' जीवपेशीमध्ये झाली आहे. या प्रारंभिक असंघटित अवस्थेची उत्क्रांति समाजाच्या उत्क्रांतिप्रमाणेच घडून आली असे म्हणता येईल. उदा० व्यक्तीच्या (सामाजिक) गरजातून जसा समाज निर्माण होतो तशी सेंद्रिय घटकांच्या रासायनिक गरजातून पहिली जीवरासायनिक संघटना निर्माण झाली असे म्हणता येईल. भौतिक प्रक्रियांनी जे सेंद्रिय पदार्थ प्रारंभिक पृथ्वीवर निर्माण झाले त्यांची प्रतिक्रिया सुरवातीला योगायोगाने झाली असली तरी पुढे त्यातून साहचर्य आणि सहकार निर्माण झाले असले पाहिजेत, हे उघड आहे. जे. बी. एस्. हाल्डेन यानी असे सुचविले आहे की, A T P (अडिनोसीन ट्रायफॉस्फेट) सारखे वेगवर्धक आणि तयार अन्नावर 'वाढू' शकणारे रेणू प्रथम निर्माण झाले असावेत† (या रेणूत शर्करा असून ती अजैविक

† हाच दृष्टीकोन एच्. ब्लम यानीही स्वीकारला आहे.








प्रक्रियेने प्रारंभिक पृथ्वीवर निर्माण झाली असल्याचे वर सांगितलेच आहे.) व अशाप्रकारचे अनेक रेणू परस्परांच्या वाढीला व पुनरुत्पत्तीला वेगवर्धकांच्या रूपाने पोषक ठरल्यामुळे, म्हणजे एकमेकांच्या रासायनिक गरजा भागवू शकल्यामुळे, एकत्र राहण्यास शिकले असावेत. अशा रीतीने परस्परांच्या रासायनिक गरजा भागविण्यासाठी ते एकत्र राहू लागल्यानंतर त्या सहजीवनापासून पुढे प्राथमिक स्वरूपाची संघटना निर्माण झाली असावी. मात्र या रासायनिक प्रतिक्रिया घडून यावयाच्या झाल्यास सेंद्रिय पदार्थांचे केंद्रीकरण (Concentration) घडून आले पाहिजे. हाल्डेन याच्या मते हे केंद्रीकरण पाण्याने संपृक्त झालेल्या मातीत घडून आले असावे. उलट प्रिंगल यांच्या मते सेंद्रिय पदार्थांच्या एकजिनसी द्रावणात (Homogeneous solution) हे केंद्रीकरण घडून येणे शक्य आहे. प्रिंगल यांचा हा सिद्धांत ए. एम्. ट्यूरिंग यांच्या एका गणिती प्रमेयावर आधारला असून या प्रमेयानुसार एकजिनसी अवस्थेपासून भिन्नजिनसी अवस्था (रचना) निर्माण होणे शक्य आहे. मात्र हे घडून यावयाचे झाल्यास स्थानिक केंद्रीकरण (Local concentration) घडून आले पाहिजे. हे स्थानिक केंद्रीकरण सेंद्रिय पदार्थात चालणाऱ्या शाखायुक्त साखळी प्रतिक्रियामुळे (branching chain reactions) निर्माण होते असे हा सिद्धांत सांगतो. या साखळी प्रतिक्रिया घडून यावयाच्या झाल्यास संथ पाण्याची आवश्यकता असल्याने पहिल्या जीवाची उत्पत्ति समुद्राच्या खोल भागात झाली असली पाहिजे असे या सिद्धांतावरुन ठरते.

### दृश्य अप्रमाणबद्धतेचा जन्म

जड वस्तु व जीव यांच्यामधील मूलभूत रासायनिक फरक म्हणजे जड वस्तूमध्ये दृश्य प्रमाणबद्धता (Optical symmetry) आढळून येते. उलट जीवामध्ये दृश्य अप्रमाणबद्धता (optical dissymmetry) आढळून येते. दृश्य प्रमाणबद्धता म्हणजे डावखुरे व व उजवे रेणू सारख्याच संख्येत असणे होय. एखादा सेंद्रिय पदार्थ कृत्रिमपणे–प्रयोगशाळेत–निर्माण केला तर त्यामध्ये डावे व उजवे रेणू सारख्याच संख्येत निर्माण होत असल्याचे आढळून येतात. उदा० मागे उल्लेख केलेल्या मिलर यांच्या प्रयोगात मिथेन, अमोनिया इ. वायूंच्या मिश्रणात विद्युत्प्रवाह खेळविला असता जी अमिनो ॲसिडे निर्माण झाली होती त्यामध्ये डाव्या व उजव्या रेणूंचे प्रमाण सारखेच आढळून आले होते. (दृश्य प्रमाणबद्धता) उलट केवळ डावे किंवा केवळ उजवे रेणू (दृश्य अप्रमाणबद्धता) निर्माण होण केवळ जीवपेशीतच शक्य आहे. ही दृश्य अप्रमाणबद्धता (उदा० डावखुरे रेणू) त्याच प्रकारच्या अगोदरच्या दृश्य अप्रमाणबद्धतेपासून (डावखुऱ्या रेणूपासून) पेशीपासून पेशी जन्मावी तशी जन्मत असून ही मूळची अप्रमाणबद्धता कशी निर्माण झाली हा महत्त्वाचा प्रश्न आहे. या प्रश्नाचे उत्तर देता आले तर जीवाची उपपत्ति लावणे सुलभ होईल. लुई पाश्चर, व्हर्नाड्स्काय इ. शास्त्रज्ञांना १९ व्या शतकात जीवाचे हे लक्षण (अप्रमाणबद्धता) कसे निर्माण झाले असावे याचे एक मोठेच कोडे पडले होते. भौतिक घटकांच्या सहाय्याने ही अप्रमाणबद्धता पेशीबाहेर निर्माण करण्याचा पाश्चरनी प्रयत्न केला होता, पण त्याला यश आले नव्हते.

जीवाच्या दृश्य अप्रमाणबद्धतेचे हे कोडे आता उलगडले आहे. गोलदिक् (circularly polarised) प्रकाशाच्या सहाय्याने ही अप्रमाणबद्धता निर्माण होऊ शकते असे आढळून आले आहे. याखेरीज इतरही घटकानी ती निर्माण होऊ शकते असे आढळून येते. उदा० जे. डी बर्नाल यानी चिकणमातीवर किंवा गारेच्या स्फटिकावर रेणूंचे संश्लेषण घडून आल तर ही अप्रमाणबद्धता निर्माण होणे शक्य असल्याचे प्रतिपादिले आहे. (जीवाची उत्पत्तीही अशाच स्फटिकावर झाली असली पाहिजे असे त्यांचे म्हणणे आहे) अकाबोरी व इकेनाका या जपानी शास्त्रज्ञाना अशा प्रकारचे (अप्रमाणबद्ध) रेणू मातीच्या कणावर निर्माण करण्यात यश आले असल्याने बर्नाल यांच्या या कल्पनेला दुजोरा मिळाला आहे. इतरही अनेक शास्त्रज्ञ असे अप्रमाणबद्ध रेणू तयार करण्यात यशस्वी झाले असून जीवाचे व्यवच्छेदक म्हणून मानले गेलेले हे लक्षण शुद्ध भौतिक घटकानी निर्माण होणे शक्य असल्याचे त्यावरून सिद्ध होते.



अनुक्रमणिका






## पहिली जीवसदृश संघटना

अशा रीतीने शर्करा, अमिनो ॲसिडे, प्रोटीन इ. सेंद्रिय पदार्थ व त्यांची जीवपेशीत आढळून येणारी अप्रमाणबद्धता भौतिक घटकानी निर्माण होणे शक्य असल्याचे अनेक प्रयोगानी आता सिद्ध झाले आहे. त्यांची स्थलकालातील संघटना कशी निर्माण झाली हा एकच प्रश्न आता शिल्लक राहतो. वर उल्लेख केल्याप्रमाणे हाल्डेन, प्रिंगल, बर्नाल इ. शास्त्रज्ञानी सुचविलेले घटक ( गारेचा स्फटिक, शाखायुक्त साखळी प्रतिक्रिया इ. ) काही अंशी कार्यक्षम ठरले असणे शक्य आहे. पण जीवाच्या उत्पत्तीसंबंधीच्या कोणत्याही सिद्धांताने एक गोष्ट विचारात घेतली पाहिजे. ती म्हणजे ज्या रेणूपासून जीवाची प्राथमिक संघटना निर्माण झाली त्या रेणूंना एकत्र आणणारी यंत्रव्यवस्था त्याना बाह्य परिसरापासून मर्यादित-सीमित – करणारी असली पाहिजे, ही अट महत्त्वाची आहे. कारण ज्या रेणुव्यवस्थेपासून ( multi-molecular system ) पहिली जीवपेशी निर्माण झाली ती रेणूव्यवस्था प्रवाही माध्यमापासून वेगळी सीमित झाली नाही तर तिची स्वतंत्र्य घटक म्हणून उत्क्रांति होणे अशक्य आहे. किंबहुना ती भोवतालच्या माध्यमाशी तिची प्रतिक्रिया घडून येऊन नष्ट होऊन जाईल. तसेच स्थलामध्ये सीमित झाल्यानंतर या रेणुव्यवस्थेला थोडेफार स्थैर्यही प्राप्त झाले पाहिजे. या गोष्टी घडून आणणारी एकच यंत्रणा अस्तित्वात आहे. ती म्हणजे कोलॉईड ( प्रवाही माध्यमात रेणूंचे कद्रीकरण घडवून आणणारी ) यंत्रणा होय. अशा कोलॉइडांचे एकत्रीकरण विशिष्ट रीतीने घडून येत असल्याचे आढळून आले असून या प्रक्रियेला कोझरव्हेशन ( coacervation ) म्हणतात. अशा रीतीने निरनिराळ्या संद्रिय रेणूंचे पुंज एकत्र आणून त्याना बाह्य परिसरापासून ( प्रवाही माध्यमापासून ) वेगळे– सीमित– करणारी ही कोझरव्हेशनची यंत्रणा जीवाच्या उत्क्रांतीला फारच सहाय्यक ठरली असली पाहिजे. जीवाच्या उत्पत्तीच्या प्रश्नाच्या सखोल अभ्यासाबद्दल प्रसिद्ध असलेले रशियन शास्त्रज्ञ डॉ. ओपॅरिन यानी त्याच्या अभ्यासाकडे म्हणूनच विशेष लक्ष पुरविले आहे. या यंत्रणेचे वैशिष्ट्य असे की एखाद्या द्रावणातील सेंद्रिय पदार्थांचे प्रमाण १% इतके अल्प असले तरी ९३% इतके सेंद्रिय पदार्थ त्या कोझरव्हेट थेंबामध्ये केंद्रीभूत होत असल्याचे आढळून येतात. म्हणजे ज्या केंद्रीकरणाची उपपत्ति लावण्यासाठी बर्नाल, प्रिंगल इ. शास्त्रज्ञानी गारेच्या स्फटिकाचा, किंवा शाखायुक्त साखळी प्रतिक्रियांचा प्रपंच केला आहे ते केंद्रीकरण या कोझरव्हेरच्या यंत्रणेने सहज घडून येत असल्याचे आढळून येते. या कोझरव्हेटचे दुसरे वैशिष्ट्य असे की जीवपेशीतील जीवरसाची ( protoplasm ) सर्व लक्षणे त्याच्यामध्ये आढळून येतात. ( उदा० त्याच्यात जीवरसाप्रमाणे निरनिराळ्या घटकापासून अंतर्गत रचना – Structure – निर्माण करण्याचे सामर्थ्य आढळून येते. ) किंबहुना जीवरस हाच एक कोझरव्हेट आहे असे म्हटले तरी चालेल.

या कोझरव्हेटचे तिसरे वैशिष्ट्य अस की त्याच्यामध्ये भोवतालच्या प्रवाही माध्यमातून (द्रावणातून) निवडक सेंद्रिय पदार्थ शोषून घेण्याचे सामर्थ्य आढळून येते. उदा. काही पदार्थ द्रावणात ०.०००००१ इतक्या अत्यल्प प्रमाणात असले तरी ते कोझरव्हेट थेंबामध्ये संपूर्णपणे शोषिले जातात; पण इतर काही पदार्थ बऱ्याच मोठ्या प्रमाणात द्रावणात असले तरी ते मुळीच शोषिले जात नाहीत. प्रवाही माध्यमापासून पदार्थ 'निवडण्या'चे कोझरव्हेटचे हे सामर्थ्य म्हणजे जीवात नंतर उत्क्रांत झालेल्या 'सहेतुक' वर्तनाची नांदीच म्हणता येईल. अशा रीतीने जड पदार्थांचे जिवंत पदार्थामध्ये झालेल्या अवस्थांतरामध्ये कोझरव्हेटला महत्त्वाचे स्थान असून त्याची प्रक्रिया या अवस्थांतराला निर्णायक ठरली असली पाहिजे. प्रोटीन, कार्बोहायड्रेट, न्युक्लिक ॲसिड इ. सेंद्रिय पदार्थांपासून संयुक्त कोझरव्हेट प्रयोगशाळेत निर्माण करण्यात आले असून त्यांच्या प्रत्यक्ष अभ्यासावरुनच वरील निष्कर्ष काढला आहे.

## 'सहेतुक' वर्तनाचा उदय

कोझरव्हेट थेंबाची पुढे उत्क्रांति घडून यावयाची झाल्यास या कोझरव्हेटचे मुक्त व्यवस्थे-( Open system ) मध्ये रूपांतर झाले पाहिजे, म्हणजे जे निवडक पदार्थ कोझरव्हेटमध्ये शोषिले गेले त्यांची कोझरव्हेटमधील पदार्थांशी प्रक्रिया होऊन त्यांचे अन्य पदार्थांत रूपांतर झाले पाहिजे व त्यापैकी निरुपयोगी पदार्थ बाहेर फेकले गेले पाहिजेत. दुसऱ्या शब्दात



अनुक्रमणिका






सांगावयाचे म्हणजे या कोझरव्हेट थेंबांची बाह्य परिसराशी गतिशीलरीत्या देवाणघेवाण झाली पाहिजे. जे थेंब ही देवाण-घेवाण– पदार्थविनिमय– करण्यास असमर्थ होते त्यांची उत्क्रांति स्थगित झाली, उत्क्रांति-प्रक्रियेतून ते वगळले गेले. उलट, ज्या थेंबामध्ये ही देवाणघेवाण क्रिया जलदगतीने झाली, पण त्या थेंबाच्या गतिशील स्थैर्याशी मात्र ती विसंगत राहिली, ते थेंब त्यांचे गतिशील स्थैर्य बिघडल्यामुळे नष्ट झाले. मात्र ज्या थेंबात ही क्रिया जलदगतीने झालीच, पण त्याच बरोबर त्याच्या गतिशील स्थैर्याशी ती सुसंगत राहिली, त्या थेंबानी उत्क्रांतीमध्ये मोठाच पुढाकार घेतला. अशा थेंबामधील रासायनिक प्रक्रिया त्या थेंबांच्या अस्थित्वाला विरोधी तर नव्हत्याच, उलट ते अस्तित्व अप्रतिहतपणे टिकविण्यास सहाय्यभूतच झाल्या. याचा परिणाम म्हणून अशा थेंबामधील रासायनिक प्रक्रिया प्रमाण-बद्ध ( Standardised ) आणि परस्परसंबद्ध ( co-ordinated ) झाल्या, आणि कोझरव्हट्मधील अंतर्गत संघटनेकडे पहिले मोठे पाऊल पडले.

या संघटनेच्या निर्मितीला द्रव्य अप्रमाणबद्धता बरीच सहाय्यभूत झाली असली पाहिजे. मागे उल्लेख केल्याप्रमाणे सेंद्रिय पदार्थांची अप्रमाणबद्धता गारेच्या स्फटिकावर निर्माण होणे शक्य असल्याच्या बर्नाल यांच्या कल्पनेला प्रायोगिक आधार मिळाला आहे. ही भौतिक घटकानी प्रारंभी निर्माण झालेली अप्रमाणबद्धताच जीव-पेशीतील हल्लीच्या अप्रमाणबद्धतेस कारणीभूत झाली असली पाहिजे. उत्क्रांतिप्रक्रियेत अप्रमाणबद्ध रेणूंचा टिकाव लागण्याचे कारण प्रमाणबद्ध रेणूव्यवस्थेपेक्षा अप्रमाणबद्ध रेणूव्यवस्थेमध्ये रासायनिक प्रतिक्रिया अधिक जलदगतीने चालतात हे होय. अप्रमाणबद्ध रेणूंची व्यवस्था अधिक कार्यक्षम असल्यामुळे जीवनझगड्यात ती यशस्वी ठरली. विशेष म्हणजे रेणूंची ही अप्रमाण-बद्धता बाह्य परिसराशी चालणाऱ्या कोझरव्हेटच्या देवाणघेवाण प्रक्रियेतच टिकू शकते, एरवी नाही, असे आढळून येते. किंबहुना ही देवाणघेवाण प्रक्रिया अशा रेणूमुळेच अधिक गतिशीलरीत्या चालू लागली असेही म्हणता येईल. यावरून ही अप्रमाणबद्धता कोझरव्हेटच्या वर उल्लेखिलेल्या मुक्त व्यवस्थेच्या (open system) निर्मितीमध्येच निर्माण झाली असली पाहिजे हे उघड आहे. अशा रीतीने कोझरव्हेटच्या प्राथमिक–मुक्त व्यवस्थेच्या निर्मितीच्या-अवस्थेत या अप्रमाणबद्ध रेणूनी त्याचे गतिशील स्थैर्य टिकविण्या- ( Self-preservation ) बरोबरच त्याची गतिशील कार्य-क्षमता वाढविण्याचेही कार्य साधले असे म्हणता येईल.

या पुढील अवस्था म्हणजे या कोझरव्हेट थेंबाना स्थैर्य आणणाऱ्या देवाणघेवाण प्रक्रियांचा परिणाम म्हणून ज्या प्रमाणबद्ध रासायनिक प्रतिक्रिया घडून येऊ लागल्या त्यांच्या गतीमध्ये विशिष्ट दिशेने झालेली वाढ होय. ही विशिष्ट दिशा म्हणजे वाढीची दिशा होय. म्हणजे सेंद्रिय पदार्थांचे विघटन घडवून आणणाऱ्या प्रति-क्रियापेक्षा त्यांचे संघटन घडवून आणणाऱ्या प्रतिक्रिया अधिक वेगाने घडून येऊ लागल्यामुळे कोझरव्हेट थेंबांच्या एकूण घनतेत वाढ होऊ लागली. कोझरव्हेट थेंब वाढू लागले. त्यांच्यामधील या प्रतिक्रियांची केवळ गति वाढली अशी नसून त्या अधिक गतिशील झाल्या. मात्र ही वाढ नैसर्गिक निवडीच्या तत्वानुसार घडून आली हे लक्षात ठेवले पाहिजे. हे थेंब वाढू शकले याचा अर्थ ते सेंद्रिय पदार्थांचा जास्तीत जास्त उपयोग करू शकले. आणि म्हणून ते वाढू न शकणाऱ्या थेंबा-पेक्षा जीवनझगड्यात अधिक यशस्वी ठरले. कोझरव्हेट थेंबाना जीवशास्त्रीय नियम लागू झाल्याचे हे पूर्व-चिन्ह होय.

कोझरव्हेट थेंबांच्या या वाढीला एंझाइमनी ( वेग-वर्धकानी ) मोठाच हातभार लावला असला पाहिजे, याविषयी कसलीच शंका नाही. कारण विशिष्ट रासा-यनिक प्रतिक्रिया वेगाने व विशिष्ट दिशेने चालणे या एंझाइमवरच अवलंबून आहे. साधे खनिज पदार्थसुद्धा हे वेगवर्धकाचे काम करू शकतात. पण प्रोटीन-सारख्या सेंद्रिय पदार्थांनी या क्रिया लाखो पटीनी अधिक वेगाने चालतात असे आढळून येते. म्हणून एंझाइमची निर्मिति म्हणजे निराळ्या सेंद्रिय पदार्थांची निर्मिति नसून पूर्वीच्या सेंद्रिय रेणूंचाच वेगवर्धकाच्या कामी उपयोग होय. जे थेंब बाह्य परिसरातून योग्य तऱ्हेचे एंझाइम्स शोषू शकले किंवा विशेषतः स्वतःच ते तयार करू शकले ते थेंब इतर थेंबापेक्षा अधिक कार्यक्षम व परिणामी जीवनझगड्यात यशस्वी ठरले. अशा थेंबात विशिष्ट एंझाइमचा उपयोग विशिष्ट प्रतिक्रिया वेगाने

घडवून आणण्यासाठी होऊ लागल्यामुळे त्याच्यातील संघटना गतिशील तर झालीच, पण त्या एंझाइमच्या कार्याची विभागणी ( division of labour ) घडून आली. एंझाइम रेणूंची रचना व कार्य यांच्यामध्ये मेळ साधल्याचेच हे लक्षण होय. याचा परिणाम म्हणून एंझाइम प्रक्रियेची यंत्रणा अधिक सुसंघटित झाली. या संघटनेमुळे थेंबाच्या विशिष्ट भागात विशिष्ट कार्यासाठी विशिष्ट पदार्थ निर्माण होऊ लागले. दुसऱ्या शब्दात सांगावयाचे म्हणजे त्या थेंबांचे वर्तन 'सहेतुक' झाले.

## प्रजोत्पादन आणि जीवनिर्मिती

या संघटनप्रक्रियेतील पुढची पायरी म्हणजे प्रजोत्पादन होय. हे प्रजोत्पादन निश्चित कसे घडून आले हे – या संबंधीच्या प्रत्यक्ष प्रयोगा अभावी – सांगणे कठीण आहे. प्रारंभी केवळ यांत्रिकपणे ते घडून आले असणे शक्य आहे. पण पुढे कोझरव्हेट थेंबातील प्रक्रियाशी ही क्रिया निबद्ध होऊन ते अंतर्गत प्रेरणेने घडून येऊ लागले असले पाहिजे. आणि हे जेव्हा घडू लागले तेव्हा जीवरासायनिक संघटना अगदी वरच्या अवस्थेला पोचली असे म्हणता यइल. ज्या गुंतागुतीच्या जीवरासायनिक प्रक्रिया थेंबामध्ये घडू लागल्या होत्या त्यांच्या स्थलकालातील संघटनेचा हा अपरिहार्य परिणाम होता. प्रजोत्पादनाची ही घटना सर्वात महत्त्वाची म्हटली पाहिजे. या प्रजोत्पादनाच्या यंत्रणेमुळेच हे कोझरव्हेट थेंब आपला वंश टिकविण्यास समर्थ झाले व अप्रत्यक्षपणे अमर झाले. कोझरव्हेट थब या प्रजोत्पादनाच्या अवस्थेला पोचल्यानंतर जीवाची उत्पत्ति झाली असे म्हणता येईल.

अशा रीतीने प्रथमदर्शनी असंभाव्य वाटणारी ही जीवाच्या उत्पत्तीची घटना पृथ्वीच्या प्रदीर्घ उत्क्रांति – इतिहासाच्या पार्श्वभूमीवर अभ्यासली असता संभवनीय दिसू लागते. पृथ्वीवरील असंख्य भौतरासायनिक प्रतिक्रियांनी जे सेंद्रिय पदार्थ सुरुवातीला पृथ्वीवर निर्माण झाले त्यामुळे प्रथम ही घटना शक्यतेच्या कोटीत आली. पुढे या सेंद्रिय पदार्थांचे कोलॉईड रूपाने जेव्हा केंद्रीकरण झाले त्यावेळी ती संभवनीय झाली. एंझाइम व अप्रमाणबद्ध रेणूंच्या उदयामुळे व त्यांच्या कोझरव्हेटमधील संघटनेमुळे शेवटी ती निश्चित झाली. उत्क्रांतीच्या प्रक्रियेमध्ये अशा रीतीने तीन अवस्थांतरे दिसून येतात. निरिंद्रिय द्रव्यापासून सेंद्रिय पदार्थांची निर्मिति हे पहिले अवस्थांतर होय. या वेळी भौतरासायनिक नियमांच्या जागी सेंद्रिय–रासायनिक नियम कार्यप्रवण झाले. सद्रिय पदार्थाचे कोलॉइडमध्ये केंद्रीकरण हे दुसरे अवस्थांतर होय. यावेळी सद्रिय-रासायनिक नियमांच्या जागी कोलॉइड-रासायनिक नियम अस्तित्वात आले. या कोलॉइडांचे कोझरव्हेटमध्ये गतिशील संघट्टीकरण हे तिसरे अवस्थांतर होय. यावेळी कोलॉईड-रासायनिक नियमावर जीवरासायनिक ( जीवशास्त्रीय ) नियम आरूढ झाले. या शेवटच्या अवस्थांतराची पूर्तता प्रजोत्पादनाने होत असल्याने ( कारण येथेच संघटनेने उच्चांक गाठला. ) येथेच जीवाची उत्पत्ति झाली असे म्हणता येईल.

## उपसंहार

जीवाच्या उत्पत्तीच्या प्रश्नाबाबत आजवर झालेल्या प्रगतीची ही केवळ रूपरेषा आहे. या प्रश्नाचे स्वरूप अत्यंत गुंतागुंतीचे असून ते समजून घ्यावयाचे म्हटले तरी अनेक शास्त्रांचा सखोल अभ्यास पाहिजे. एका शास्त्रज्ञाचे प्रयत्न या बाबतीत अर्थातच अपुरे आहेत. यासाठीच अनेक शास्त्रज्ञांनी आपापल्या विशिष्ट अभ्यासकोनातून या प्रश्नावर हल्ला चढविला आहे. उदा० युरे यांनी खगोलशास्त्रीय, बर्नाल यांनी भूरसायन शास्त्रीय, प्रिंगल यांनी उष्णतागतिशास्त्रीय, ओपॅरिन यांनी जीवरासायनशास्त्रीय, अशा भिन्नभिन्न दृष्टिकोनातून या शास्त्रज्ञांनी हा प्रश्न हाताळला आहे. स्वाभाविकपणे या शास्त्रज्ञांनी आपापल्या अभ्यास क्षेत्रावर विशेष भर दिला आहे. परिणामी त्यांचे सिद्धांतही किंचित् भिन्न झाले आहेत. ही अनिश्चितता प्रत्यक्ष प्रयोगांच्या अभावापेक्षा या प्रश्नाच्या अत्यंत गुंतागुंतीच्या स्वरूपामुळे निर्माण झाली आहे हे मात्र लक्षात ठेवले पाहिजे. तथापि ओपॅरिन यांचा कोझरव्हेटचा सिद्धांत अनेक कसोट्यातून उतरत असल्यामुळे–त्यास पुढे अधिक प्रायोगिक बळकटी मिळेल या अपेक्षेने–तूर्त मान्य करण्यास हरकत दिसत नाही. पण हाल्डेन यांनी सुचविल्याप्रमाणे जीवाची उत्पत्ति कदाचित वरील








सर्व शास्त्रज्ञानी सुचविलेल्या पद्धति कार्यान्वित होऊन –म्हणजे सहकारी तत्वावर–झाली असण्याचीही शक्यता आहे. (आणि अप्रमाणबद्धतेच्या निर्मितीची उपपत्ति लावण्यासाठी बर्नाल यांच्या सिद्धांताचा आधार घ्यावा लागतो या गोष्टीचा मागे उल्लेख आलाच आहे.) आणि म्हणून ही घटना एकाच पद्धतीने घडून आली असे मानणे किंवा ती यावी अशी अपेक्षा करणे कदाचित् चूक ठरेल. एका गोष्टीविषयी मात्र कोणाचेच दुमत नाही. ती म्हणजे ही घटना शुद्ध भौतिक नियमानी नैसर्गिकपणे घडून आली आहे. आणि हा या प्रश्नाचा सर्वांत आशादायक भाग आहे. कारण जी घटना स्वाभाविकपणे घडून आली आहे तिची उपपत्ति आज नसली तरी आणखी शंभर वर्षांनी लावणे शक्य आहे.










श्री. द. वें. केतकर*

## ज्ञानेश्वरी तिसरा अध्याय

# लुप्तोपलब्ध ओव्यांची समस्या ( प्रथमार्ध )

## कसाला उतरल्या तरी......प्रक्षिप्त ?

### आमच्या संशोधनाचा काल व फल

( १ ) इ. स. १९३९ साली– " कावरुखे म्हणजे क्षणभंगुर "– असा अर्थ टीपात दिला आहे तो बरोबर का– असे एक पृच्छापत्र आले. बरेच दिवस विचार करून– वृक्ष–रुख; कुवृक्ष–कुरुख; कवरुख, कावरुख= बांडगूळ – असा अर्थ लिहून पाठविला. तेव्हापासूनच संशोधन सुरू झाले ते आज २३–२४ वर्षे " ढाळें ढाळें " चालू आहे. मध्यंतरी इ. स. १९५१ साली हौस म्हणून तंजावर-संग्रहातून १–२–३ अध्याय नकलून मागवले. तो आश्चर्य असे की, तिसऱ्या अध्यायात श्लो. ४२ खाली दोन व श्लो. ४३ खाली एक अशा तीन ओव्या उपलब्ध झाल्या.

( २ ) नंतर कुतूहलाने **जालगिरी**–हस्तलिखित पहाता त्यात समासात श्लो. ४० खाली एक उत्कृष्ट ओवी आढळली. कालांतराने **बिटे**–प्रतीत नेमकी तीच ओवी श्लो. ४० खाली आढळली. समाधान झाले.

( ३ ) याप्रमाणे तिसऱ्या अध्यायातील श्लो. ४०, ४२,४३ खालच्या मूळ ज्ञानदेवीतील ज्ञानदेवमुद्रांकित **चार** ओव्या ज्या लुप्त झाल्या होत्या त्या संशोधनद्वारे आम्हाला इ. स. १९५१ मध्ये उपलब्ध झाल्या म्हणून त्याना आम्ही– **लुप्तोपलब्ध ओव्या**– अशी सार्थ संज्ञा दिली आहे.

### संशोधनाचे उत्कृष्ट फल–

### लुप्त ओव्या उपलब्ध झाल्या.

( ४ ) ज्ञानेश्वरीतील काही ओव्या लुप्त झाल्या आहेत किंवा निदान असाव्यात, अशी पुसट शंकाही गत ६०० वर्षात कोणासही आली नाही, व येण्याचे कारणही नव्हते. कारण तसल्या त्रासदायक व कटकटी स्वरूपाच्या संशोधनात्मक अभ्यासाच्या भानगडीत कोण पडणार !! आम्हाला देखील संशोधनाच्या धांगडधिंग्यात त्या अवचित मिळाल्या. एवढे अतिरथी महारथी चमकले खरे. पण हे सौभाग्य माझ्यासारख्या एका सामान्य पाईकाच्या भालपट्टावर कोरले होते. असो.

### एकंदर लुप्तोपलब्ध ओव्या तेरा ( १३ )

( ५ ) कालांतराने या नवीन दृष्टीनेही संशोधन पुढे चालविले तो कर्मधर्मसंयोग असा की ज्ञानेश्वरमुद्रांकित अशा तंजावर १८ अध्यायांच्या हस्तलिखितात दहा ( १० ) व जालगिरी-हस्तलिखितात तीन (३) अशा एकंदर तेरा ( १३ ) ओव्या उपलब्ध झाल्या व त्यायोगे ज्ञानेश्वरी ओवीसंख्या ९००९ ( नऊ हजार नऊ ) ही मिति निश्चित करण्यास फार मदत झाली. ज्ञानदेवमुद्रा नसलेल्या कोणत्याच ओव्यांचा विचार आम्ही केला नाही.

( ६ ) नंतर हा प्रश्न नव्यानेच आम्ही नवभारत, जून १९५९ पृ. ५९ ) जनतेपुढे मांडला. तो पाहून श्री. मंगळूरकर-प्राध्यापक यानी, त्यांच्या उच्च पदवीला साजेसे स्वागत करून म्हणतात---

> * केतकरांनी मांडिलेला हा ( लुप्तोपलब्ध ओव्यांचा ) विषय अगदी नवीन असून, ज्ञानदेवीच्या अभ्यासकांनी त्यात लक्ष घालावे अशा योग्यतेचा आहे. तथापि आजपर्यंत असे लक्ष कोणी घातलेले नाही.
>
> * ( ज्ञाने० ३ रा अध्या. पृ. २७७. तळटीप )

* दि: २१।११।६३ रोजी महानज्योतिषी व संस्कृत पंडित ***श्री. दत्तात्रय वेंकटेश केतकर*** हे वार्धक्यामुळे निवर्तले, याबद्दल आम्हास अत्यंत खेद होत आहे. नवभारताची वारंवार सेवा त्यानी केल्याबद्दल त्यांचे आम्ही कृतज्ञ आहोत. आम्ही ही श्रद्धांजली त्याना अर्पित आहोत. –का. सं.

स्वसंपादित, ज्ञाने० ३ ऱ्या अध्यायातील हा त्यांचा उद्बोधक शेरा त्यांच्या रसग्रहणाची व गुणग्रहणाची साक्ष देतो.

### तंजावर व राज० प्रत–प्रकृष्ट साम्य

( ७ ) संशोधनद्वारे असेही नजरेस आले की– तंजावरप्रत व राजवाडेप्रत या दोहोत प्रकृष्ट साम्य आहे. ज्ञानदेवमुद्रांकित असून, प्रतिपाद्यविषयाला अत्यंत आवश्यक, किंबहुना अटळ, अशा ११३ ओव्या, राजवाडेप्रतीतून निसटल्या आहेत त्या भरून काढायला इतर प्रतींच्याबरोबरच ही तंजावरप्रत फार उपयुक्त होऊन, शिवाय राजवाडेपाठही रूढीत येतील या हेतूने या चारही लुप्तोपलब्ध ओव्या ज्ञानदेवाभिप्रेत स्थली प्रविष्ट करून एक सुसंवादी पृष्ठ मागील अंकात आम्ही वाचकांच्या समोर मांडिले आहे ते असेः— हल्ला करून कामक्रोधांना जिंकावयाला, अर्जुना, मी तुला एक मूलभूत ( भला ) उपाय म्हणजे त्यांचे वास्तव्यस्थान सांगतो ते ऐकः—

इन्द्रियाणि पराण्याहुरिन्द्रियेभ्यः परं मनः।
मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः॥
—अ. ३ श्लो. ४२

( ८ ) श्लो. ४२ ऱ्या खालच्या **ज्ञानदेवमुद्रांकित** दोन ओव्या–

शरीरा इंद्रिये पर। म्हणिपतीं साचार।
तेयां मन, जे व्यापार। प्रवृत्तीचा चाळी॥ २७०॥
तेया मना पर बुद्धि। बुद्धीसी आत्मा अवधि।
एवं सर्वांसी, सुधी। तोचि पर॥ २७१॥

एवं बुद्धेः परं बुध्वा संस्तभ्यात्मानमात्मना।
जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम्॥
– अ. ३ श्लो– ४३

( ९ ) श्लो. ४३ ऱ्या खालची **ज्ञानदेवमुद्रांकित** ओवी–

तेया बुद्धिपरा आत्मेया। जाणौनिया धनंजया।
तेथ निश्चल होउनी एया। दुष्टां जीणे॥ २७२॥

यानंतर चालू प्रतीतल्याच ओव्या अध्यायाखेरपर्यंत आहेत.

( १० ) आस्थेच्या वाचकांनी कटाक्षाने निरीक्षावे.

( १ ) गीतेचा मूळ श्लोक ४० व ओवी २६५.
(पहा क्र. ४१ जाड ठसा अ ब क)
( २ ) ,, ,, ४२ ,, २७०, २७१,
( ३ ) ,, ,, ४३ ,, २७२

( ११ ) हे वाचून आमच्या गुरुजींप्रमाणेच वाचकही स्वयंस्फूर्तीने म्हणतील– " लुप्त झालेल्या ओव्या उपलब्ध झाल्या– हे फार सुरेख झाले." असे म्हणण्याइतक्या त्या ओव्या, इष्ट स्थली आकांक्षित आहेत, त्यांना बाधकप्रमाण नाही. शिवाय ओवीबंध पूर्ण ज्ञानदेवी थाटाचा आहे. या सर्व साधकप्रमाणांच्या बलाने त्या त्या स्थली त्या त्या ओव्यांची स्थापना केलीच पाहिजे. ( **शिफारसपत्र.** )

### हा लेख का लिहिला

( १२ ) राजवाडेप्रतीच्या जगावेगळ्या अभिमानाने दाटून " सुधी " या संबोधनाचा- हे शहाण्या अर्जुना- असा अर्थ असताही, त्याचा भलताच अर्थ करून, अप्रस्तुत, अप्रशस्त, व वरील चुकीच्या अर्थावर आधारलेल्या भाषिक पुराव्याचे सोंग उभे करून, त्या सोंगापुढे प्रत्यक्ष ज्ञानदेवी ओवीबंधालाही झिडकारून कसाला वगैरे न लावताच काही आक्षेपकांनी या चारही ओव्या ' प्रक्षिप्त ' ठरविण्याचे धाडस केलेले पाहून त्यांच्या या अव्यापाराचा सप्रमाण, समूळ झाडा घेतल्याशिवाय गत्यंतर नाही म्हणून आम्हाला हा गंभीर समस्येचा लेख लिहावा लागला आहे.

### घाई की विलंब

( १३ ) पूर्वोक्त ४ ओव्या १९५१ मध्ये उपलब्ध झाल्यावर त्या पुनः पुनः कसाला लावल्या, ज्ञानेश्वरीभक्तांकडे पाठविल्या, साहित्यिकांच्या नजरेस आणल्या, नंतर आठ वर्षांनी इ. स. १९५९ मध्ये नवभारतात प्रसिद्ध केल्या तरी– काही अभ्यासू म्हणतात–मुळात नसलेल्या ओव्यांविषयी काही मांड मांडणे-हे इतर काही नसले तरी घाईचे खास होईल. ( पृ. २०८ ) याच्या उलट **आमचे गुरुजी** लिहितात–प्रस्तुत, आकांक्षापूरक उत्कृष्ट ओव्या प्रसिद्ध करण्यात आपण अक्षम्य विलंब केला आहे.

### ( १४ ) आक्षेपकांचे असामंजस्य

( अ ) स्वस्वीकृत राज० प्रतीत किंवा इतर प्रतीत या ओव्या नाहीत म्हणून ते कूपमंडूकाच्या आवेशाने " मुळात नसलेल्या " असे म्हणत आहेत. **पण आमच्या** मूळ तंजावर प्रतीत व तिच्या शके १६३६ च्या

मूळ प्रतीत -अशा दोन पोथ्यात त्या ओव्या आहेत. आता चिकित्सकाचे विधान जाग्यावर कोठे राहते ? या असामंजस्याला काय म्हणावे ?

( ब ) आठ वर्षांनंतर प्रसिद्ध केल्या तरी आक्षेपक घाईच म्हणतात हेही असामंजस्यच नव्हे काय ? मग विलंब कशाला म्हणतात ?

## ज्ञानदेवीदीपिका-रचना मार्गदर्शक

( १५ ) दीपिकेच्या रचनेतील ज्ञानदेवांचा विशिष्ट दृष्टिकोन समजला तर मूळ गीताश्लोकांशी संबंध राखून, त्यातील सखोल किंवा उथळ, लघु किंवा गुरु, साक्षात् किंवा परंपरेच्या मूळ शास्त्रध्वनींचा, ध्वनि-स्थलांचा त्या त्या ठिकाणी साजतील अशा, कशा कशा स्वरूपाच्या ओवीप्रबंधांनी ज्ञानदेवांनी परामर्श घेतला आहे–हे स्पष्ट कळेल व त्यायोगे राजवाडे प्रतीतील किंवा इतर प्रतीतून **निसटलेल्या** ( लुप्त ) **ओव्यांचे**, किंवा आधीच **अधिक** असलेल्या ओव्यांचे त्याज्यत्व किंवा ग्राह्यत्व देखील निश्चित करितां येईल. म्हणून नवीन ओव्या उपलब्ध होतांच, दीपिकेच्या उभारणीचाच विचार अगोदर करून, ज्ञानोबांचा दृष्टिकोन व विद्वदुक्तींच्या आधारे आक्टोबर अंकांत एक कसोटी सिद्ध केली व त्या कसौटीवर चारही नवीन ओव्या घासल्या, व त्या कसाला पूर्ण उतरल्या. अर्थात् त्या ओव्या ग्राह्य असल्याची सप्रमाण **प्रतीति** आली. ही सर्व संशोधनप्रगति आक्षेपक मंडळींना पहावयास मिळाली असती तर बरे झाले असते. पण तसा योग नव्हता. बरे त्यांनी तरी स्वतः एक कसौटी सिद्ध करायची होती–तेही केले नाही. मग काय–मायामय भाषिक पुराव्यावरच ते पूर्ण विसंबले, ते इतके की, सर्व भांडवल घालवून बसले–तरी देखील त्यांना ते कळले नाही. कसे ते पहा—

## चिकित्सकांच्या तळटीपा पार उध्वस्त.

( १६ ) आमच्या नवीन ओव्यांना दीपिकेत प्रवेश मिळू नये म्हणून त्यांनी आपल्या टीपांच्या पृ. २०८, २०९, २१०, २११ खाली तळटीपांचा बाजार भरवून त्यांत नवीन ओव्याविषयक कुशंकाचा भडिमार करता करता ज्ञानदेवी-दीपिकेच्या शैलीसंबंधी स्वानुभवाची काही निस्संग वाक्ये तळटीप १ मध्ये रेखाटली आहेत. परंतु ती सर्वही दुतोंडी आहेत. हेतू हा की या नाही त्या तोंडात या नवीन ओव्या अडकून पडाव्या. पण नवीन दिसल्या तरी, त्या प्रत्यक्ष ज्ञानदेवांच्या मुद्रांकित ओव्या आहेत. त्यांना कोण अटक करणार ! त्यांच्या एकूण एक तळटीपा पार उध्वस्त करून त्यांनी दीपिकेत स्वागतपूर्वक प्रवेश कसा मिळविला आहे ते खाली स्पष्टपणे दाखविले आहे. त्या–तळटीपांनी आक्षेपकांशी फितूरी करून, त्या केतकरांना येऊन मिळाल्या आहेत. ( पृ. २०८, तळटीप. १– मधीलच मूळची वाक्ये दिली आहेत. )

## नवीन ओव्यांचा सरळ प्रवेश

( १७ ) **आक्षेपकांचे- १ ले वाक्य**— मूळ गीताश्लोक आणि त्यावरील ज्ञानदेवांच्या ओव्या या अर्थतः नेहमीच चिकटून असतात असे नाही.

आमचे उत्तर- अर्थतः नेहमीच चिकटून असतात असे नाही. म्हणजे

अ–वर्ग – कधी चिकटून असतात.

ब–वर्ग – कधी चिकटून नसतात.

| अ वर्ग | ब – वर्ग |
|---|---|
| कधी चिकटून असतात | कधी नसतात |
| या अ–वर्गात २६५, २७०, २७१, २७२, या नवीन ओव्या अर्थास चिकटून असल्याने नेमक्या त्या त्या श्लोकाखाली बसतात. | |

(१८) **चिकित्सकाचे २ रे वाक्य**— किंबहुना ओव्यातील विवरण अथवा विवेचन फार वेळा उत्सूत्र असते.

याचाच अर्थ—

( १ ) फार वेळा उत्सूत्र असते– ( अ - वर्ग )

( २ ) थोड्या वेळा उत्सूत्र नसते. ( ब–वर्ग )

| अ – वर्ग | ब – वर्ग |
|---|---|
| फार वेळा उ. असते | थोडया वेळा उत्सूत्र नसते |
| | चारही नवीन ओव्या या ब वर्गात यथेष्ट बसतात. कारण त्या उत्सूत्र नसल्यापैकीच आहे. |

(१९) चिकित्सकाचे— ३ रे वाक्य— कधी कधी मूळ श्लोकांचा पदशः अर्थ त्यात असतो तर कधी कधी नसतो. म्हणजे

(१) पदशः अर्थ कधी असतो (अ – वर्ग)
(२) पदशः अर्थ कधी नसतो (ब – वर्ग)

| अ – वर्ग | ब – वर्ग |
|---|---|
| पदशः अर्थ कधी असतो | पदशः कधी नसतो |
| नवीन ओव्यातील पदशः अर्थ कधी कधी पैकीच असल्याने त्या सर्व ओव्या या अ-वर्गात बसतात. | |

(२०) आक्षेपकांचे— ४ थे वाक्य— कधी मूळाला अभिप्रेत नसलेला असा नवीनही विषय असतो. याचा अर्थ–

(१) अ – वर्ग– कधी नवीन विषय असतो
(२) ब – वर्ग ,, ,, ,, नसतो.

| अ – वर्ग | ब – वर्ग |
|---|---|
| कधी असतो | कधी नवीन विषय नसतो |
| | कधी कधी नवीन विषय नसलेल्या या चारही ओव्या या ब–वर्गात नेमक्या बसतात. |

(२१) चमत्कारिक– ५ वे वाक्य- कधी कधी मूळ श्लोकातील एखाद्याच पदावर ज्ञानदेवांचे चित्त रमते. (हे पुरे करू का ? पण उपाय नाही).

**आमचे उत्तर**– कधी कधी म्हणजे केव्हा ? तो विशिष्ट प्रसंग किंवा विशिष्ट स्थल न सांगणारे व आमच्या व्यतिरिक्त, इतर वाचकांना बुचकळयात पाडणारे असले घसरडे विधान किंवा विधाने– ज्ञानेश्वरांना मुळीच खपणारी नाहीत. असो. याचा अर्थ–

(१) अ– वर्ग– कधी एखाद्याच पदावर.

(२) ब– वर्ग– कधी अनेक पदावर.

| अ – वर्ग | ब–वर्ग |
|---|---|
| कधी एखाद्याच पदावर | कधी अनेक पदावर |
| | मूळ श्लोकातील अनेक पदांवर भर आहे म्हणून या आमच्या नवीन चारही ओव्या येथे स्वागताने बसतात. |

(२२) विलक्षण– ६ वे वाक्य– कधी कधी श्लोकातला त्यांना जाणवलेला अभिप्रायच ते देतात. याचा अर्थ–

(१) अ–वर्ग–कधी जाणवलेलाच अभिप्राय. किंवा
(२) ब- वर्ग– कधी त्याहून अधिकही अभिप्राय ते देतात.

| अ–वर्ग | ब–वर्ग |
|---|---|
| जाणवलेला अभिप्रायच | कधी अधिकही |
| चारही ओव्यांत जाणवलेला अर्थच ज्ञाने० दिला आहे म्हणून नवीन ओव्यांचे स्वागत. | |

विरोधकांचा **निर्णय**– अशा प्रकारच्या अनेकविध विवेचनाचा अवलंब ओव्यात केलेला असल्यामुळे– "गीताश्लोक व ओव्या, यात अर्थाअर्थी काहीच सबंध नाही"– या (केतकरांच्या) विधानाचे बळ बरेचसे गळून जाते– (पृ. २०८ तळटीप १).

**या निर्णयाला उत्तर**— केतकराचे म्हणून उध्दृत केलेले —

"गीताश्लोक व ओव्या यात अर्थाअर्थी काहीच संबंध नाही" –

हे विधान केतकरांचे नाही. असले आगापिच्छा नसलेले-बेवारसी ढोबळ विधान केतकरांनी मुळीच केलेले नाही, व ते करणारही नाहीत. (पहा क्र. २३ टीप) - हे आक्षेपकांनी आवर्जून लक्षात ठेवावे.

### आमचे ठाम विधान

(२३) "४० वा श्लोक व त्या खालच्या २६६, २६७ या ओव्या यात अर्थाअर्थी काहीच संबंध नाही- असे स्पष्ट स्पष्ट, ठावठिकाणासह विशिष्ट स्थलाला अनुलक्षूनच केतकरांनी विधान केलेले आहे. ते दुतोडी नाही, घसरडेही नाही, ठाम आहे."

### गृहीत कसे दिसले ?

(२४) आणखी एक आश्चर्य असे की, वरील सुटसुटीत, स्पष्ट निर्देश घटित, कोरन सांडिता केलेल्या, त्याच विधानात-वावदूकांना "गीताश्लोक व भाष्य-भूत ओव्या यांचा संबंध असलाच पाहिजे" – हे गृहीतही गोचर झालेले आहे. त्याना आम्ही विचारितो की –

"ते गृहीत कोणत्या चष्म्याने किंवा सूक्ष्मदर्शक यंत्राने दिसले ? उलट त्यानीच ते गृहीत धरले आहे कारण- "**निराळ्या श्लोकाखाली** [२] **निराळ्याच ओव्या पडल्या आहेत**"- एवढाच आमचा अर्थ असून तो आमच्या विधानात स्पष्ट आहे. "असलाच पाहिजे" वगैरे शब्द आमच्या विधानात मुळीच नाहीत व असण्याचे कारणही नाही. प्राध्या० नीच ते गृहीत धरले आहे.

(२५) आमच्या उपरिनिर्दिष्ट २३ क्र० तील विधानाला, क्रमाने क्र० १७ पासून दिलेल्या पूर्वोक्त सहाही वाक्यात, त्यांच्या उत्तराचा गंधही नाही इतकेच नव्हे तर त्यांच्याच सहा वाक्यांच्या दरवाजा-तून चारही लुप्तोपलब्ध ओव्या हत्तीसारख्या डुलत डुलत आत शिरून, ज्ञानदेव-संकल्पित दीपिकेतील स्थानी स्वागतपूर्वक जाऊन बसल्या, यात कोणाचे (क्र० २१) बळ गळले ? "गीतेवीण रंगु दावी" – या प्रतिज्ञेचा पाठपुरावा करणाऱ्या जबरदस्त ओव्यांचे किंवा तन्निदर्शक स्पष्ट स्पष्ट अशा केतकर विधानांचे बळ गळेल की फळेल !!

आक्षेपकांच्या त्या सहाही वाक्यांची मात्र- "केले तुका झाले माका" – अशी शोचनीय परिस्थिति झाली आहे. (अविवेकः परमापदां पदम्)

### शोचनीय परिस्थितीचे उघड कारण

(मागील क्र० १७ पासूनच्या सहा वाक्यांना अनुसरून)

(२६) कधी कधी वृक्षसिंचनच करीत राहील, तर कधी झाडेच उपटून टाकील. कधी फुलांचा वास घेत बसेल, तर कधी ती चुरगाळून टाकील. कधी एकाच फुलाकडे पहात बसेल, तर कधी गुच्छाकडे पाहणारही नाही. तो मालकाला नेहमीच ओळखेल असे नाही. कधी सर्वांग चेपील; तर कधी गुद्दे घालील-अशासारख्या तुटक्या विधानानी, डोळ्यापुढे ठाण्यातील एक भ्रमिष्ट मात्र जसा उभा राहतो– त्याचप्रमाणे –वरील सात वाक्ये एकत्र वाचली तर ज्ञानेश्वरांच्या ऐवजी वाटेल त्यावेळी वाटेल ते करणारा एक माथेफिरू डोळ्यापुढे उभा राहतो. उदाहरणार्थ, वाक्यातील पालोपदे पहा– (१) कधी चिकटून असतात-कधी नाही (२) कधी उत्सूत्र-कधी नाही. (३) कधी पदशः अर्थ असतो, कधी नसतो. (४) श्लोक व ओव्या संबंध असतो, कधी नसतो. (५) श्लोकाला भाष्य अस्तरासारखे चिकटले असते

---

१. "संबंध नाही," हे आक्षेपकांनाही आमच्याप्रमाणेच पूर्ण पटलेले आहे. म्हणूनच त्यानी श्लो. ४० व ओ. २६६,२६७ यात "दूरतः तरी खचित संबंध सांगता येतो"- असे बादरायणी नाते जोडिले आहे. "नेहमीच संबंध असतो असे नाही" असे आम्हाला बजावून नाकाने वांगी सोलणाऱ्यानी "संबंध दाखविण्याची" खटपट का केली ? का म्हणजे ? राजवाडेप्रतीविषयक आमचा अभिनिवेश आम्हाला वदतोव्याघात करावयास लावितोना !!

२. – राज० प्रत ओ. २६२ "एक भला उपाय तुला सांगेन" असे भगवान् म्हणतात. अर्थात् तो भला उपाय म्हणजे कामक्रोधांच्या मूलभूत अधिष्ठानाचा पत्ता सांगणे, व पत्ता समजला म्हणजे त्या अधि-ष्ठानावर छापा घालणे. आता अधिष्ठान भगवंतानी श्लो. ४० मध्ये सागितले आहे. अर्थात् २६२ पर्यंतच्या ओव्या (२५८-२५९-२६०-२६१-२६२) श्लोक ४० च्या वर म्हणजे श्लो० ३९ च्या खाली पाहिजेत. त्या ओव्या श्लो. ४० च्या खाली (म्हणजे भिन्न स्थळी पडल्या आहेत) चूकून आल्या आहेत-एवढेच आम्ही म्हटले आहे.



अनुक्रमणिका







तर कधी नसते. यावर प्रश्न- कधी कधी म्हणजे केव्हा ? असतात-केव्हा ? नसतात-केव्हा ? पदशः अर्थ-केव्हा ? समूहशः केव्हा ? वगैरे.

(२७) या वरील प्रश्नांची उत्तरे प्रा. च्या वाक्यातून मिळण्याची आशा आहे काय ? अर्थात् भिन्न भिन्न भाष्यलेखनप्रकार ज्यामुळे स्फुरतात त्या त्या प्रसंगांच्या सूत्रात ही वाक्ये गोविली नसल्याने त्या पालोपदांची शोचनीय परिस्थिति झाली आहे.

**ही ज्ञानदेवांची शैली नव्हे.**

( २८ ) वाटेल तेव्हा चिकटून असतात, व वाटल तेव्हा चिकटून नसतात असे त्यांना सुचवायचे असल तर आम्ही त्याना स्पष्ट बजावतो की- ही उच्छृंखळ शैली ज्ञानदेवांची नाही. " मूळध्वनीचियें वाढी। निमित्त जाला " मूळध्वनिताला साजेल असा परामर्श त्यानी घेतला आहे. एक दृष्टांत- हे इतिहासाचे प्रोफेसर. एकूणएक ऐतिहासिक प्रसंग याना विदित आहेत. तसेच आरंभापासून आतापर्यंत सर्व तारिखा, महिने व इसवी वर्षे ही त्याना मुखोद्गत आहेत. उणीव एवढीच की कोणता प्रसंग कोणत्या वर्षी घडला, एवढेच माहीत नाही. बाकी सर्व तयारी आहे. त्यांच्या पालोपदांची अशीच हास्यास्पद परिस्थिति आहे त्याना ज्ञानदेवांची शैली माहीत आहे. तिचे प्रकार माहीत आहेत. पण त्या प्रकाराचे प्रसंग ( ज्ञानदेवानी दिले असून देखील ) त्यानी त्यांचे ठाम निर्देश केल नाहीत. कोणत्याही संशोधनाला " कधी असते, कधी नसते " हे दुतोंडी पालोपद काय कामाचे ? या सरड्याची धाव कुंपणा-पर्यंतच ! !

( २९ ) शंका काढण्याची कितीही कसरत केली तरी नवीन ओव्यांचा प्रतिबंध त्याने होत नाही. ओवीसाम्य, चरणसाम्य यानी शब्दांचे यादवकालीनत्व परीक्षिले जाईल- परंतु प्रतिबंध होणार नाही. तसेच " पुनरुक्त "- " नवीन काहीच नाही "- यानीही प्रतिबंध होत नाही. अशा परिस्थितीत भाषिक पुरावा कोणत्या झाडाचा पाला !!! या नामधारी पुराव्याने ओवीप्रतिबंध कधीच व्हावायचा नाही.

( ३० ) आज व्यवहारात असलेल्या भाषेची व्युत्पत्ति अद्याप कोणाच्या हाताला लागेना. अंधार गजबजून राहिला आहे. अशा प्रसंगी यादवकालीन भाषेच्या मर्यादा अज्ञात, शब्दसृष्टि अज्ञात, सर्व वाक्प्रचार अज्ञात- या अर्धवट कच्च्या पुरणातून भाषिक पुराव्याच्या पोळ्या कोण करू इच्छील- कोण घजेल ? व्याकरणाप्रमाणेच भाषिक पुराव्याचे स्वतंत्र व निराळे क्षेत्र असेल. पण त्याने ओवीप्रतिबंध होणे नाही.

**आक्षेपकांच्या संशोधनाचा नमुना पहा.**

( ३१ ) आमच्या संशोधनाचे स्वरूप आम्ही वर निर्दिष्ट केलेच आहे. अर्थात् त्याचे सत्फलही हाती लागले आहे. आता येथे आक्षेपकांच्या संशोधनाचे स्वरूप दाखवितो. म्हणजे त्यांना कोणत्या प्रकारचे फल मिळेल ते सहज समजेल.

आम्ही क्र० २ मध्ये जालगिरी-प्रत व इनामदारांच्या विटे-प्रतीचा निर्देश करून त्यांचे आनुकूल्य आम्हाला संशोधनाचे कामी किती लाभले ते स्पष्ट लिहिले आहे. या संशोधनाचे संशोधन आक्षेपकांनी किती रसाळपणे केले आहे ते पहा-

**आक्षेपकांचे संशोधन-श्रमाचा नमुना-पहा.**

( ३२ ) प्रश्नावर प्रश्न- इनामदारांची प्रत ही जालगिरी-प्रतीची नक्कल आहे काय? तसेच ही ओवी इनामदारप्रतीतहीं समासगतच आहे काय ? जालगिरी व इनामदार या दोहोंचा प्राचीनत्वाच्या दृष्टीने तुलनात्मक, भाषिक अथवा अन्य अधिकार काय व केवढा ? तो शब्द कितीदा आला आहे ? कुठे- ? कसा ? एकाच प्रतीत का ? इतर प्रतीत का नाही ? हे विधान मोघम आहे- अतिप्रसंग उद्भवेल; हे अनुमान आहे- हे विवाद्य .... म्हणून त्या **ओव्या प्रक्षिप्त ठरतात.** मग मूळ गीता-श्लोकाला त्या कितीही चिकटून असोत ! !

**केतकर**- हेच त्यांचे भव्य संशोधनश्रम ! ! प्रश्नांची सरबत्ती ! किती बारकावा ? किती सूक्ष्मता ? किती व्यापक प्रश्न ! ! शिवाय, वर मजा ही की, या प्रश्नांची उत्तरे त्यांनी स्वतः शोधायची नसून त्यांची उत्तरे केतकरांनी पुरवायची आहेत ! ! ! या पोकळ संशोधनाच्या बळावर- " श्रम करून, शरीर झिजवून-द्रव्यव्यय करून, अहोरात्र विचार करून, केतकरांनी प्रगट केलेल्या ज्ञानदेवमुद्रांकित लुप्त ओव्या " - हे संशोधक म्हणे- प्रक्षिप्त ठरविणार ! ! मग सगळाच कारभार आटोपला म्हणायचा.








### तळटीपांचा संकलित समाचार

(३३) संपादकीय टीपांच्या २०८, २०९, २१०, २११ या पृष्ठांखाली सशोधकांनी तळटीपांचे पीक उभारले आहे. पृ. २०८ खालची तळटीप १ ली ही मुख्य माता आहे. तिचीच पिले म्हणजे बाकीच्या तळटीपा. मूळ माताच मंद असल्याने तिची पिले उतरत्या क्रमाने, मंद, मंदतर, मंदतम झाली आहेत. पहिली माताच केतकरांना फितूर झाल्याबरोबर सर्व कुटुंब होणारच, व ते फितूर झालेच! आता सारे संशोधक मात्र एकाकी उरले आहेत. उपाय नाही! असल्या बिनबुडाच्या तळटीपा का द्याव्या?

### पृ. २०९ टीप ४- कुशंकांचा गुंतवळ

(३४) या टीपेतील विंचरून विंचरुन एकत्र केलेला कुशंकांचा गुंतवळ खरोखर प्रेक्षणीय आहे. त्यांचा हा फारच रम्य पराक्रम आहे. तिसऱ्या अध्यायावरील टीपालेखनश्रमाच्या सहस्रपट श्रमाने ही तळटीप टिपली आहे. ज्ञानदेवांच्या शैलीहून वरचढ असे हे शंकाप्रकार आहेत. त्यात नाद, ध्वनि, चातुर्य, कुसर, व नक्षी, गहिवरून आल्या आहेत. ज्ञानदेव ज्ञानसागरात, तर हे शंकासागरात जणू क्रीडत आहेत- गीतार्थसंशोधनात देखील ते इतके रमलेले नाहीत. परंतु उच्चासन टाकून तळटीपेसाठी असल्या तलभूमीवर आक्षेपकांनी यावयास नको होते. त्यानी तारतम्याला पार फाटा दिलेला पाहून कीव येते.

### या टीपेचे समूळ खंडन

अत्यंत अनिष्ट म्हणजे ही तळटीप स्वतः केलेल्या " सुधी " शब्दाच्या साफ चुकीच्या अर्थावर आधारली आहे. (पहा क्र. ४७).

पृ. २१०, टीप १. मुद्रांकन

(३५) विरोधक- साम्याधारे मुद्रांकन सांगणे अतिरिक्त होईल.

**केतकर-** त्यांचाच गैरसमज झाला आहे. केवळ साम्याधारे मुद्रांकन आम्ही मुळीच सांगितलेले नाही व सांगणारही नाही. नवभारत आक्टोबर १९६३ पृ. ४० वरील लक्षणाचे मुद्रांकन आम्ही स्वीकारिले आहे शिवाय आम्ही तेथे दाखविलेले ओवीसाम्य मुळीच नसून केवळ ओवीबंधाचे साम्य, व त्या बरोबरच त्या ओवीतील शब्दांचे व प्रस्तुत ओवीतील शब्दांचे " यादवकालीनत्व " हे भाषिक साम्य दाखवून त्यायोगे मुद्रा सिद्ध केली आहे. विरोधकाचे विधान स्वकल्पित आहे.

(३६) याप्रमाणे पृ. २०८,२०९,२१० या पृष्ठांचा व त्या खालच्या सर्व तळटीपांचा समाचार घेतला. आता फक्त पृ. २११ तील एका दिव्य भाषिक पुराव्याला तोंड द्यावयाचे आहे. स्वतः विरोधकच " केतकरांना नाडणारा एक बिनतोड भाषिक पुरावा देतो "- असे सांगत आहेत. (पहा क्र. ४७,४९, )

### केतकर निर्भय आहेत

(३७) कसौटीला लावून परीक्षणात पास झालेल्या ओव्यांचाच पाठपुरावा केतकरांनी केल्यामुळे- त्यांच्या सशोधनाला मुळीच भीती नाही. कसौटी चुकीची आहे असे कोणता अभ्यासू दाखवितो ते अवश्य पाहू. ती नवीन कसौटी पाहून तिचे सर्वांगसमीक्षण करू. ती सर्वश्रेष्ठ ठरल्यास त्या कसौटीवर या ओव्या घासल्या म्हणजे काम झाले. ज्ञानेश्वरदेखील याने संतुष्ट होतील. असो, आता भाषिक पुराव्याला सामोरे जाऊ.

या भाषिक पुराव्याचे बाणामागून बाण सोडन आमच्या छुतोपलब्ध ओव्या नष्ट करण्याचा विरोधकांचा बेत आहे. त्यांचे बाण खालीलप्रमाणे आहेत---

### भाषिक पुरावा : जबरदस्त की जमीनदोस्त.

(३८) **विधान १ ले** - तंजा. प्र - तया, आत्मया, या रूपाऐवजी **तेया** व **आत्मेया**- अशी रूपे पाहिजेत. अर्थात् ओव्या **प्रक्षिप्त.**

**केतकर-** हा बुडत्याला काडीचा आधार आहे. शक १६३६ च्या रूपांना भाषिक प्रमाणाने वळण सहज देता येते. न आले तर ते " भाषिक प्रमाण " कसले? पोतेभर मोत्यांत एक (मोतीच पण जरा) जाड मोती दिसला तर कोणी संपूर्ण पोते त्याज्य मानतील काय? ओव्या प्रक्षिप्त ठरत नसून उलट त्या अधिकच ग्राह्य ठरतात. " अल्पस्य हतोबहु हातुम् " कोण शहाणा इच्छील? शिवाय, त्यांच्या प्रिय राज० प्रतीत देखील ही अभाषिक रूपे बरीच आली आहेत ना? मग असला सापत्नभाव का? आणि स्वतःवर उलटणारी प्रमाणे हे लोक काय म्हणून देतात!!

(३९) **विधान २ रे** - या ओव्या भाषिक पुराव्याने मुद्रांकित ठरत नाहीतच.



अनुक्रमणिका







केतकर– ओवीबंधाचा डौल, पदांचे तोल, चरणांची चाल, तालबद्धता व उद्‌गारांचा ठामपणा, या विशिष्ट शैलीच्या ठशाने अंकित ज्या ओव्या– त्या ज्ञानदेव-मुद्रांकित ओव्या– हा आमचा संकेत आहे. यात यादव-कालीन शब्द, रूपे, प्रयोग अंतर्भूत आहेतच.

(४०) यादवकालीन मुद्रा वगळी व ज्ञानदेवी मुद्रा वेगळी. कारण केवळ यादवकालीन शब्द, रूपे, प्रयोग, प्रचार, व वळण, या प्रकारांनी ज्ञानदेवमुद्रा सिद्ध होत नाही किंवा मोडत नाही. म्हणून– "तया (तेया)– आत्मया– (आत्मेया)– अंतरीहुनी (आंतरौनि)– ऐकें (आइकें)– यांसीचि (येयांसी चि)– अशा कंसाबाहेरच्या शब्दांनी फार तर यादवकालमुद्रा मोडेल, पण त्याच शब्दांनी ज्ञानदेवमुद्रा कदापि भंगणार नाही. कारण शब्द लोपेल, बदलेल, पण ठसा भंगणार नाही म्हणूनच त्याला मुद्रा अशी संज्ञा दिली आहे. **निर्णय**– संकेतित मुद्रानुसारे ओव्या प्रक्षिप्त ठरत नाहीत. ज्ञानदेवमुद्रा म्हणजेच ग्राह्य. त्यांनी ज्ञानदेवमुद्रांकिताचा अर्थ समजून घ्यावयास पाहिजे होता. यादवकालीन मुद्रा सर्वसामान्य तर ज्ञानदेवमुद्रा ही यादवकालातीलच परंतु विशिष्ट– असा भेद स्पष्ट आहे.

आतापर्यंत सोडलेल्या इतर बाणाबरोबरच वरील दोन्ही बाणही फुकट गेले आहेत. सारांश ओव्या ग्राह्य किंवा त्याज्य ठरविण्याची जबाबदारी किती त्रासदायक आहे हे वाचकबंधूंना सहज कळून येईल.

## (४१) आता "अनुमान" या बाणाची फेक–

आक्षेपक – " हे अर्थातच केतकरांचे अनुमान आहे.

केतकर – अनुमान नसून प्रत्यक्ष प्रतीत गोष्ट आहे– हे खालील विवरणावरून स्पष्ट कळेल.

मूळातील ध्वनिताची फोड करण्याची कामगिरी मी केली आहे—अशी ज्ञानेशांची प्रतिज्ञाच आहे म्हणजे ज्या (क्र. २८) स्थली मूळ शास्त्रध्वनित आहे, त्या मूळ श्लोकांचा परामर्ष मी न चुकता घेतला आहे. त्याप्रमाणे आम्ही श्लोक ४० वा (अ) वाचला.

— गीता ३ रा अ. श्लो. ४० वा.

(अ) ३

इन्द्रियाणि मनो बुद्धिरस्याधिष्ठानमुच्यते ।
एतैर्विमोहयत्येष ज्ञानमावृत्य देहिनम् ॥ ३·४०

त्यातील अत्यंत महत्वाचा शास्त्रप्रयोजक ध्वनि आम्हाला पटला. यावर भाष्यभूत ओव्या (प्रतिज्ञेनुसार) असल्याच (किंवा असलीच) पाहिजे हे लक्षात ठेविले. नंतर त्या श्लोकाखालच्या राज० प्रतीतील ओव्या (का) (डा) पाहिल्या –

(का) तैसे उपाय कीजेति जे जे । ......... २६३
(डा) ऐसेया ही सांकडा बोला ।
एकु उपायु असे भला ।
तो करी पां जरी आंगवला ।
सांघैन तुज ॥ २६४ ॥

ज्ञानदेवांच्या प्रतिज्ञेनुसार त्यात अधिष्ठानाचा निर्देश आढळला नाही, म्हणून समाधान झाले नाही. कालांतराने जाल० प्रतीत ४० व्या श्लोकाखाली दाखल करण्याकरिता –

विटे–प्रत हस्तलिखित }
जालगिरी ,, }

**मूळ ओव्या**

(ब) इंद्रियें मन बुद्धीचां ठाईं ।
एयांचें बिढार असे पाही ।
म्हणौनि ज्ञान देहीचां देहीं ।
आवरिलें असें ॥ २६५

समासात एक (ब) ओवी दिली आहे. ती पाहिली. ती ओवी ध्वनिताविषयीच्या प्रतिज्ञानुसारी म्हणजे अधिष्ठानाच्या निर्देशाने युक्त असून उत्कृष्ठ आहे. नंतर तीच ओवी विटेप्रतीत (पृ. २१०—तळटीप २) यथास्थानी पाहिली. पूर्ण समाधान झाले. कसाला लाविल्या. नंतर कालेकरून ती नवभारतात प्रसिद्ध केली. त्या वेळी त्या ओवीच्या--

---

३. – अ, डा – वरील (अ) श्लोकात कामक्रोधांचे प्रत्यक्ष अधिष्ठान सांगितले आहे. परंतु डा – ओवीत ज्ञानदेव म्हणतात " त्याचे अधिष्ठान मी सांगेन " अर्थात् " अधिष्ठान सांगितल्यानंतर "– " अधिष्ठान सांगेन " – या विधानांत " पूर्वापरविरोध " स्पष्ट आहे. म्हणून " का " व " डा ' – या दोन्ही ओव्या अ च्या वर म्हणजे ३९ व्या श्लोकाच्या ओवीभाष्याच्या शेवटी यावयास पाहिजेत. तरच पूर्वापरविरोध दूर होईल. असो. प्रस्तुत विषय अगोदर घेऊ.

* " सर्वगुणप्रतीतीच्या आधारे- ४० व्या श्लोकाखाली असलेली ज्ञानदेवी मुद्रांकित ओवी (वरील ब) लुप्त झाली म्हणून श्लो० ३९ खालच्या शेवटच्या दोन ओव्या श्लो० ४० खाली आणल्या गेल्या–हे सुप्रतीत तत्त्व मी ठासून सांगितले व अद्यापही सांगेन– *

–असे विधान मी केले तर, त्यावर विरोधक सहज लीलेने पटकन् (म्हणजे अविचाराने) म्हणतात– (तळटीप)

अर्थातच हे केतकरांचे अनुमान आहे. ते कसे डळमळीत आहे हे पृ. २०८, तळ (१) टीपेत सांगितलेच आहे.

(४२) केतकरांचे उत्तर—आता तळटीप १ जागेवर कोठे आहे? स्वतःच्या डळमळीतपणामुळे ती पार (क्र. १४ पहा) रसातळाला पोचली आहे. ती म्हणे आमच्या "अनुमानातील डळमळीतपणा" दाखविणार!! पण आम्ही अनुमान देखील कोठे केलेलेच नाही. क्र. २९ वरून श्लोक. ४० च्या खालची मुद्रांकित ओवी लुप्त झाली–हे आमच्या प्रत्यक्ष प्रतीतीचे विधान आहे–ही गोष्ट त्यांना स्वयंबुद्धीने समजली नसेल तर ती आक्टोबरमध्ये कळून येईल. खरी हकीकत माहीत नसताना ती समजून घेण्याऐवजी त्यानाच हे अनुमान केले आहे. याचा अर्थ इतकाच की, सशोधनाचे श्रम न घेता सहजगत्या "प्रताताला" जसे ते बिनदिक्कत "गृहीत" म्हणतात. तसेच प्रस्तुतासारख्या महत्त्वाच्या प्रसगी "प्रत्यक्षालाही" ते बेधडक "अनुमानच" मानतात. अथवा कदाचित्- "नावडत्या ओव्यांचे मीठ अळणी" असेल. असो- कोळसा उगाळावा तितका काळाच!!!

(४३) विधान ३ रे– मागील क्र. ६, २७१ व्या ओवीतील ३ ऱ्या चरणात "सुधी" असा शब्द आला आहे. तो ज्ञानदेवीच्या कोणत्याही प्रतीत आलेला नाही. म्हणजे या ओवीवरील ज्ञानदेवी मुद्रा मोडली. ओवी प्रक्षिप्त.

**केतकर**– तंजावर हस्तलिखित ज्ञानेश्वरीतूनच आम्ही या प्रस्तुत चार लुप्त ओव्या पुढे आणल्या हे नवभारतद्वारे जगजाहीर झाले असता देखील त्यानी– "जुन्या नव्या कोणत्याही प्रतीत तो शब्द नाही"– असे असत्य विधान कशासाठी केले? तो शब्द कितव्या चरणात आला आहे हेही त्याना माहीत आहे. मग हे खोटे विधान का? तंजावर–लिखित प्रतीला ते "ज्ञानदेवीच" मानीत नाहीत की काय? हे एक नवीनच आश्चर्य आहे!!!

विरोधक पुढ म्हणतात– "त्या ओवीवरची मुद्रा मोडली". याला आमचे **चोख उत्तर**– साधकसद्भाव व बाधक-अभाव– या जोडीच्या द्वारेच "निर्णय" सिद्ध होतो. प्रस्तुत "सुधी" शब्दाच्या बाबतीत आक्षेपकांनी केवळ "साधकांचाच" विचार केला. पण तंजावरप्रत त्यांच्या विधानाला बाधक आहे. अर्थात् "मुद्रा मोडली" हा निर्णय नष्ट झाला. "मुद्रा आहे" हा केतकरांचा मूळचा निर्णय निष्कंटक अत एव सुरक्षित झाला.

(४४) "तुष्यतु" न्यायाने तो शब्द कोठेही नाही– असे क्षणभर गृहीत धरू. तरी देखील त्या एका शब्दामुळे "**तीन ओव्या**" प्रक्षिप्त कशा ठरतात? की, आक्षेपकानी "मुखमस्तीति वक्तव्यम्" याचा प्रयोग केला आहे? तरी बरे तर बरे, ज्ञानदेवीतील सर्व ९००० ओव्याच प्रक्षिप्त आहेत– असा आक्षे. नी निर्णय दिला नाही– हे ज्ञानदेवीचे सुदैव नव्हे का!!

## राजमार्ग झाला असता

(४५) राजवाडे प्रत- ओवी २३८. "मानेयाचे व आखलीचे" या त्रिभुवनात कोठेही न आलेल्या शब्दांमुळे ती ओवी प्रक्षिप्त का मानिली नाही? असा– "अयं निजः परोवेति गणना लघुचेतसाम्" व्यंकट मार्ग का धरावा? त्यापेक्षा वरील स्थलप्रमाणेच, या प्रस्तुत "सुधी"- या स्थली देखील– "सुधी या शब्दाचा अर्थ आम्हास लागत नाही." – असे म्हटले असते तर खरोखर राजमार्ग झाला असता.

**टीप**– सुधी या शब्दाचा अर्थ आक्षेपकांना खरोखरीच समजला नाही हे खालील लेखनावरून आरशासारखे स्वच्छ दिसेल.

(४६) **आक्षेपकांचे विधान ४ थे**– बरे "**सुधी**" हा शब्द **आत्मा, जीवात्मा** अशा अर्थाने क- ओवीत अपेक्षित आहे. या अर्थाने हा शब्द येतो का? कोठे कितीदा? आम्हाला तरी तो कोठेही आढळला नाही.





अनुक्रमणिका

( ४७ ) **केतकरांचे उत्तर–** कसा आढळणार!! ज्ञानेश्वरांनी पदोपदी वापरलेल्या सुभटा - सुवीरा - सुवर्मा सुबुद्धी - सुमती यासारखेच–

( हे ) सुधी = हे शहाण्या अर्जुना–

हेही त्याच पंक्तीपैकी– अर्जुनाला उद्देशून केलेले संबोधन आहे– हे टीपालेखनसमर्थ प्रवीणांच्या लक्षात येऊ नये हे आश्चर्य आहे!! सुधी - म्हणजे– आत्मा, जीवात्मा– हा त्यांनी केलेला अर्थ सपशेल चूक आहे. अर्थात् पृ. २११ वरची तळटीप १, हीही उध्वस्त झाली.

### इष्ट फलश्रुती

( ४८ ) **फलश्रुति–** आक्षे. च्या शंका व तळटीपा यांचा समाचार घेतला, आता त्यांची एकही टीप बाकी राहिली नाही. त्यायोगे आमची सर्व विधाने तावून सुलाखून वर्चस्वी झाली. चारही मुद्रांकित ओव्या ग्राह्य होण्याचा योग आक्षे. नीच जुळवून आणिला. असो.

### बिनतोड भाषिक पुरावा उडून गेला

( ४९ ) वरील क्र० ४७ तील– " सुधी = हे शहाण्या अर्जुना– " हा सहज बालबोध अर्थ " न सुचल्याने " स्वकल्पित खोटा अर्थ निश्चित करून, त्यावर " बिनतोड भाषिक पुरावा ( क्र. ३६ ) असा छाप मारून " ते शस्त्र, आमच्या संशोधित ओव्यावर फेकण्यात आले तरी ते बूमरॅंग शस्त्राप्रमाणे प्रक्षेपकांवरच उलटले व त्या शस्त्राच्या म्हणजे क्र० ३२ तील त्यांच्या विधानाच्या चिंधड्या उडाल्या. आमच्या ओव्या " अप्रक्षिप्त " ठरल्या.

### धडा घेणे प्राप्त आहे

( ५० ) कसाला लावणे वगैरे सर्व परीक्षण प्रयोग केल्यानंतर जनतेपुढे, किंवा अभ्यासूंच्या पुढे, सादर केलेल्या ज्ञानदेवमुद्रांकित ओव्या, नुसत्या शंकांनी, प्रश्नांच्या सरबत्तीने–किंवा भाषिक वगैरे लंगड्या पुराव्याने–प्रक्षिप्त ठरविण्याची घाई न करणेच बरे–हा धडा इतःपर सर्वांनी घेणे अगत्याचे ठरत आहे.

---











संकलक- कृ. मा. घटाटे

# बुद्ध व नववा अवतार

## हिंदुधर्मदृष्ट्या संत श्रीगुलाबरावमहाराज यानी केलेली समीक्षा

आपल्या आर्यधर्मात गौतमबुद्धाला दशावतारांपैकी नववा अवतार मानतात. भगवान विष्णु वैदिक धर्माचे संरक्षण करण्याकरिता आणि दुष्टांचे निर्दालन करण्याकरिता युगायुगात अवतार घेतो. अवताराची मुख्य प्रयोजने दोन आहेत. एक प्रेमप्रपालन आणि दुसरे धर्माचा उद्धार ! पैकी धर्माचा उद्धार करताना ( १ )-दुष्टांचा प्रत्यक्ष संहार करून वैदिक धर्माचे शुद्धीकरण आणि अवैदिक आचरणापासून संरक्षण करणे हा एक प्रकार आहे. आणि ( २ ) वैदिक धर्मात राहून वैदिक धर्माचा ऱ्हास करू पाहणाऱ्या असुरांना मोह पाडून त्यांची दिशाभूल करून, हिंदुधर्मातून बाहेर काढणे, हा दुसरा प्रकार आहे. यातील पहिला प्रकार तर सर्वच अवतारांचे ठिकाणी दिसतो. परंतु दुसरा प्रकार फारच कमी अवतारात पहावयास मिळतो. तेव्हा तोच आपण पाहू. अमृतमंथनाचे वेळी भगवान विष्णूने मोहिनीचे रूप घेतले, असुरांना सुरा पाजली व देवांना अमृत दिले. अशा रीतीने दुष्ट प्रवृत्तीच्या असुरांना फसवून आपले अवतारकार्य केले. तसेच भस्मासुराने जेव्हा त्रिभुवनाला त्राहि त्राहि करून सोडले तव्हा भगवान शिवाने पुनः मोहिनीचे रूप घेतले. भस्मासुराला आपल्या रूपाने मोहित केले आणि शेवटी त्याचेही भस्म केले. असे अनेक प्रकारचे अवतार धेऊन भगवान् वैदिक धर्माचे संरक्षण करीत असतो. जेव्हा कलियुगाच्या सुरुवातीला क्षत्रिय राजे अति उन्मत होऊन वैदिक धर्माच्या नावाने यज्ञात भयंकर पशुहिंसा करू लागले आणि खरा वैदिक धर्म दूषित होऊ लागला, त्यावेळी वैदिक धर्माच्या शुद्धीकरिता विष्णूने बुद्धावतार घेतला आणि वैदिक धर्मात असलेल्या. पण असुर प्रवृत्तीच्या लोकांना अहिंसेचा उपदेश करून मोह उत्पन्न केला— त्यांना वैदिक धर्मातून बाहेर काढले व वैदिक धर्माची शुद्धि केली.

अशा या बुद्ध अवताराविषयी सामान्य लोकांच्या मनात काहीसा गोंधळ आहे. पण खरोखर अवतारासंबंधाने भारतीयांचा शास्त्रीय दृष्टिकोन काय आहे, ते नीट समजावून घेतले तर अनेक शंका—कुशंकांचे तत्काल निरसन होईल आणि हिंदुधर्माची विशुद्ध धारणा विचारवंताच्या दृष्टिसमोर येईल. अवतार म्हणजे काय, अवतारांच्या कक्षेत बुद्ध येतो की नाही. वेदपुराणांच्या मते बौद्ध धर्माचा उपयोग काय, श्रीशंकराचार्यांनी बौद्धांचे खंडन का केले, बुद्धाची उपासना कशी करावी, श्रीवसिष्ठाचार्य आणि श्री ज्ञानेश्वरमहाराज यांनी शून्य-सिद्धांताचा केलेला वेदांतपर अर्थ, तसेच नागार्जुन व आलोक मालकार बौद्ध यांनी वेदान्ताचा केलेला थोडा फार अंगीकार, इत्यादि अनेक दृष्टिकोनातून श्रीगुलाबरावमहाराजांनी बौद्ध धर्म त्याज्य असूनही त्याचे अधिकारभेदाने प्रामाण्य कसे आहे याचा सूक्ष्म विचार केलेला आहे. त्यापैकी साधुबोध, संप्रदायसुरतरु, रुक्मिणी पत्रिका व द्वितीय यष्टि इत्यादि ग्रंथात अनेक ठिकाणी सद्गुरु श्री गुलाबराव महाराजांनी मार्मिक प्रश्नोत्तररूपाने बुद्धमतमीमांसा केलेली आहे. ती प्रश्नोत्तरे जशीच्या तशी पहाणे हेच सोईचे होईल.

प्र० :– “बुद्धाविषयी तुम्हाला पूज्यबुद्धि आहे काय ?”

उ० :– “होय. बौद्धांपेक्षाही जास्त आहे. बौद्ध त्याला मनुष्य समजतात तर आम्ही त्याला देव समजतो. बौद्ध आणि जैन धर्मात अवताराचा जो आभास आहे, तो देखील ‘ऊर्ध्वगामी लोकांचा अतिशय’ आहे, अवतार नव्हे !”

साधुबोध नावाच्या ग्रंथात श्री महाराज म्हणतात, “अवताराची परीक्षा अशी करून पहावी. (१) एकतर तो पुराणात विशेष रीतीने सांपडला पाहिजे. (२) नाहीतर अवताराचे जे सामान्य लक्षण गीतेत भगवंतानी केले आहे, ते तरी त्याच्या अंगी असले पाहिजे ; वैदिक धर्मासाठी त्याचे हातून महत्कार्य झाले पाहिजे. इतर











अनुक्रमणिका

धर्माचा असेल तर त्याला वैदिकधर्मीय अवतार मानण्याचे काही कारण नाही."

प्र० :– "पण तुम्ही तर बुद्धालाही अवतार समजता ?"

उ० :– "त्याचे नाव पुराणात आले आहे म्हणून अवतार समजतो. तो वंदनीय असला तरी त्याचे मत विशेषकरून आम्हाला मान्य नसते. किंवा त्याचे मत प्रत्यक्ष त्याच्या शिष्यांना समजले नाही असे तरी आम्हाला म्हणता येते." "पण एखाद्या खानसाम्याचे नाव अवतार म्हणून आम्हाला पुराणात सापडत नाही, म्हणून त्याला विशेष अवतार मानता येत नाही. आता वैदिक धर्माचे स्थापन हे सामान्य लक्षण त्याचे ठिकाणी दिसले पाहिजे. ते जर नसले तर अवतार म्हणून आर्यांना त्याला शरण जाण्याचे काही कारण दिसत नाही."

– (साधु० पृ. १४७)

## बुद्धजातक आणि पुराणे यांचा समन्वय

प्र०:– "बुद्धाला पुराणात अवतार म्हटले आहे व बुद्धजातकात तर त्याच्या पूर्वजन्मीच्या अनेक कथा सांगितल्या आहेत. तेव्हा हे कसे जुळणार ? आणि त्या जातकातील काही कथा बुद्धाने स्वतः सांगितल्या आहेत !"

उ०:– "विभूतियोगाने या सर्वांचा समन्वय होतो. बुद्धजातकातील नायक विष्णूच्या विभूति असून बुद्ध हा अवतार आहे, असे आम्हाला म्हणता येते. हा 'धर्मसमन्वय'च होय, धर्मसंकर नव्हे !"

## शंकराचार्यांनाही बुद्धावतार मान्य, पण काही मतांचे खंडन

प्र०:– शंकराचार्यांनी बुद्धावतार का मानला नाही ?

उ०:– बुद्धावतार शंकराचार्यांनी मानला आहे. कारण तसे नसते तर "बौद्धावतारे श्रीरामक्षेत्रे ......" इत्यादि हिंदूचें कर्मकांडातील संकल्पच त्यांनी बंद केले असते !

बौद्धांच्या अधिप्रज्ञाशिक्षेचेच आचार्यांनी खंडन केले आहे. शिवाय "ईश्वर आहे की नाही अशा गोष्टी मला विचारू नका" असे बुद्धाने बौद्धांना उत्तर दिले आहे. आणि या प्रश्नांचे उत्तर त्याने शिष्यांवर सोपविले आहे. 'अधिचित्तशिक्षेत्' योगशास्त्राने खंडन केले आहे तथापि ते अधिप्रज्ञाशिक्षेला धरून आहे. अधिशीलशिक्षेचे कुमारिल भट्टांनी खंडन केले आहे; पण ते चमत्कार दाखवून केलेले आहे, वाद करून केले नाही. शिवाय बुद्धाची 'अधिशीलशिक्षा' आपल्या ग्रंथातीलच असल्यामुळे मला मान्य आहे. बुद्धाची 'अधिप्रज्ञाशिक्षा' मात्र जैन गुरुपासून घेतलेली आहे. बुद्धाचे गुरु ब्राह्मण होते असे अश्वघोषांनी म्हटले असून बुद्धाचे गुरु जन होते असाही ऐतिहासिक शोध आहे. 'अधिशीलशिक्षा' वैदिक सामान्यधर्मापेक्षा अधिक काही नाही. त्रिपित्तकांपैकी सूत्तपित्तकातच बुद्धाचा जशाचा तसा उपदेश आहे. हिंदुधर्मांत जे त्याचे खंडन सांपडते ते सूत्तपित्तकाचे नाही.

प्र० :– 'बुद्ध वैदिक मतानुयायी होता, असे कोणी म्हणतात हे खरे आहे काय ?'

उ० :– होय 'वेदाचा अर्थ जाणल्यानेच ब्राह्मण होतो,' असे त्याने स्पष्ट म्हटले आहे. बुद्धाने हिंसात्मक यज्ञमंत्रांचीच निंदा केली आहे. ज्ञानकांडात्मक वेदमंत्रांची निंदा केलेली नाही, असा गीतगोविंदाचा आशय आहे.

## बुद्ध आणि ईश्वर

प्र० :– बुद्ध ईश्वर मानीत होता काय ?

उ० :– होय. परंतु त्याचे स्वरूप दुर्ज्ञेय आहे, असे म्हणत होता. मांडुक्य पुत्राला बुद्धाने असे सांगितले आहे की, मी जेवढे प्रकट केले तेवढे प्रकट होऊ द्या व जेवढे गुप्त ठेवले तेवढे गुप्त राहू द्या" यावरूनही 'जगत्कर्ता कोणीही नाही' असे बुद्धाने स्पष्ट सांगितलेले नाही.

## बुद्ध जाती मानतो

"जैन सहकारी जो बौद्ध धर्म, त्यात गुणकर्मांनेच जाती मानली आहे, ते वाक्य येणेप्रमाणे –

"न जच्चा वसलो होती, न जच्चा होति बाम्मणो ।
कम्मणा वसलो होती, कम्मणा होति बाम्मणो ॥"

संस्कृत छाया –

न जात्या वृषलो भवति, न जात्या भवति ब्राह्मणः ।
कर्मणा वृषलो भवति, कर्मणा भवति ब्राह्मणः ॥

— ब्राह्मण, शूद्र जन्माने होत नाही तर कर्मानेच होतो, हा या वाक्यांचा भावार्थ आहे. (संप्र. सुरतरु)

'हिंदुधर्मातील जातिभेद आवडत नाही म्हणून बुद्धधर्माचा स्वीकार केला तरी गुणकर्माने होत असलेल्या









अनुक्रमणिका

-उच्चकनिष्ठ जाती असल्यामुळे जातिभेदाचा द्वेषही करता येत नाही.

### बुद्ध जर अवतार तर बौद्धधर्म – पतितांकरिताच का ?

प्र० :– आपल्यामध्ये भगवान बुद्धाला परमेश्वराचा अवतार म्हटले असून सूतसंहितेत व मेरुतंत्रात 'पतितांनी' त्याच्या मताचा स्वीकार करावा, असे सांगितले आहे – हे कसे ? ( संप्र, सुरतरु ३३३–२ )

श्रीगुरु :– बुद्ध परमेश्वराचा अवतार आहे, याविषयी ( हिंदुमधील ) कोणाचाच विवाद नाही. त्यातील अहिंसादि तत्त्वे विरोधीही नाहीत. शून्यवादाचा व विज्ञानवादाचा पूर्वी समन्वय केला आहे आणि सर्वास्तित्ववाद अज्ञ मूर्खांच्या मोक्षप्रवृत्तीला वाढविणारा आहे किंवा शून्यावरील भ्रमपक्ष वेदान्ताचा पर्याय किंवा तो न्यायाचा पर्याय आहे. परंतु अनधिकारी पुरुषांना मोहामुळे हे समजत नाही.

सर्वप्रत्ययक्षणिकात कालप्रत्ययही क्षणिक असल्यामुळे, कालावर अवलंबून असणारे क्षणिकत्वच सिद्ध होत नाही. काल नित्य मानल्यास जे कालाला ईश्वर मानतात त्यांच्या मताचा बौद्ध मतात कसातरी प्रवेश होतो. आम्ही बुद्धाला परमेश्वर समजतो तसे बौद्ध समजत नाहीत, म्हणूनच आम्ही त्यांचे मत निंद्य मानतो. सर्वच अविद्यामय असल्यामुळे शून्यास ब्रह्म मानल्यास, व जडात कार्य करण्याचे सामर्थ्य चेतनच आहे, असे मानल्यास, बौद्ध मताचा व वेदान्त मताचा विरोध येत नाही.

ही तात्विक चर्चा असो; पण अधिकारभेदाने मेरुतंत्रात फार छान सांगितले आहे. ते श्लोक आणि श्रीमहाराजांचे त्यावरील स्पष्टीकरण तुलनेने पहाण्यारखे आहे –

'अथातः संप्रवक्ष्यामि बौद्धमंत्रं महाफलम् ।
सम्यत्वाद्द्विजातीनामधिकारोस्ति कर्हिचित् ।। १३१४ ।।
वाममार्गरता विप्राः कुण्डका जातिविच्युताः ।
हीना वेदसंस्कारैः प्रमादान्म्लेच्छतां गताः ।। १३१५ ।।
बुद्धं विष्णुं समरभ्य भुक्तिं मुक्तिं प्रयान्ति ते ।।
( मेरु. प्रकाश २६ )

एकंदर १३२८ पर्यंतचे श्लोक संप्रदायसुरतरूत उद्धृत केलेले आहेत. विस्तारभयास्तव येथे घेत नाही.

या सर्व श्लोकांचे रहस्य इतकेच आहे की सकाम पुरुषाने बुद्धाचे सपरिवार पूजन करावे, निष्कामपुरुषाने केवळ हा मंत्रच जपावा, व बुद्धाचे ठिकाणी विष्णुभावना करावी.

आम्हीही बुद्धाला देव समजून नमस्कार करतो, तसा बौद्ध करतील तर या जन्मी ते भागवत असून जन्मांतरी ते पूर्ण भागवत होतील. ( संप्र. सुरतरु )

### वाममार्गीयांना बौद्ध धर्मानेच गति का ?

वाममार्गी लोकांनाही बौद्ध धर्मानेच जी गति सांगितली आहे, त्याचे कारण बौद्धधर्मातील अंतःकरणधर्म उत्तम आहेत. .

यद्यपि बौद्धमार्गापेक्षा वाममार्गाला आर्य थोडेसे मानतात त्याचे कारण तत्वज्ञानदृष्टीने तो निरात्मवादाइतका किंवा स्याद्वादा इतका वेदाशी विरुद्ध नाही. परंतु आचारदृष्टीने बौधाचारच त्यापेक्षा उत्तम आहे असे मी म्हणतो. कारणः–

मद्यं मांसं च मीनं च मुद्रा मैथुनमेव च ।
एते पंचमकारास्युर्मोक्षदा हि युगे युगे ।।

इत्यादि भयंकर प्रकार बौद्ध धर्मात नाहीत. बौद्धांना जर आर्यधर्मात येण्यास जन्मान्तर लागेल, असे कोणाचे म्हणणे असेल तर वाममार्गीयांनाही ते लागलेच पाहिजे, असे मी म्हणतो. याप्रमाणे कर्मपंथाने आर्यधर्मात येण्याकरिता अदृष्ट कारणास्तव जन्मांतरानेच इतरांना येता येते. भक्तिपंथात कोणालाही येण्याचा अधिकार आहे. तपाने ब्राह्मणपणा मिळविण्यास योगसूत्रात सांगितल्याप्रमाणे जात्यन्तरपरिणामाची जशी आवश्यकता आहे तशी ईश्वर मिळविण्यास नाही. याप्रमाणे प्राचीन आर्यमतास अनुसरून सर्व धर्माचा हा समन्वित विचार केला आहे. आता सर्वथा स्वभोगाचा व स्वाहंकाराचा परित्याग करून तीव्र भक्तीने सर्वच भगवंताला अर्पण करील तर कोणतेही कर्म भागवत धर्मातच अन्तर्भूत होते हे आम्ही वारंवार प्रतिपादिलेच आहे.

### इतर धर्मांना हिंदुधर्मात कशाला ओढता ?

प्र० :– आता कोणी मग असे म्हणेल की, तुम्ही सर्व धर्मांना आपल्याकडे ओढू पहाता, तसे त्या धर्मात का जात नाही ?

उ :– आम्ही कोणाला ओढीत नाही, हे आताच सांगितले आहे. आमच्या धर्मात सर्व धर्मांची तत्वे संकलित झाली असल्यामुळे ती सर्व आम्हाला प्राप्तच आहेत. त्यामुळे कोणाकडून समजून घेण्याचीही अपेक्षा नाही.

### क्षेपकवाद म्हणजे अनवस्थाप्रसंग

वादी :– अहो, एवढा समन्वय केला. त्यापेक्षा पुराणादिकांना क्षेपक मानले असते म्हणजे झाले असते!

सिद्धान्ती:– तशाने ज्याला जे आवडत नाही ते तो क्षेपक मानेल व सर्व अव्यवस्था होईल. जरी पुराणादि ग्रंथात कोठे कोठे क्षेपकाभास होतो त्याचा 'कायव्यूह' विचाराने समन्वय होत असल्यामुळे, व ते पुराणऋषी आणि आचार्य दिव्यदृष्टि आदि सामर्थ्येकरून अस्मादिविशिष्ट असल्यामुळे त्यांच्या वाक्यांचे तात्पर्यच आम्हाला मान्य आहे! परंतु आम्हालाही विचारीत असणाऱ्या, आमच्यापेक्षाही न्यून दिसत असणाऱ्या तुझ्यासारख्या वादीचा 'क्षेपकवाद' घेऊन आम्ही आपली स्वधर्मनिष्ठा का दवडावी, हेच शांकरमताचे सहिष्णुत्व आहे! व त्याच मताचे आम्ही भागवत आहोत!!

### वेदान्त आणि बौद्धमताचा समन्वय

"यं शैवा समुपासेत शिव इति, ब्रह्मेति वेदान्तिनो।
बौद्धा बुद्ध इति, प्रमाणपटवः कर्तेति नैय्यायिकाः।
.........॥

यात वैदिक व अवैदिक मतांचा समन्वय झालेला आहे. बौद्धातील अन्तःकरणचिन्हे उत्तम आहेत परंतु 'निरात्मवाद व निरीश्वरवाद' या दोन गोष्टीमुळे वैदिक धर्माशी त्याचा भेद आहे. त्यात शून्यवादाचा व वेदान्तातील ब्रह्मवादाचा 'थोडासा' समन्वय योगवासिष्ठकारांनी केलेला आहे.

### शून्य म्हणजेच चिती

बौद्धांचे शून्य आमची चिती।
एकचि ऐसे वशिष्ठ बोलती।
बृहद्वासिष्ठीं बहुत असती। श्लोक ऐसे ॥ ७५ ॥
आणि ब्रह्मास शून्य शब्द। ज्ञानैश्वर्यादिस्थानी प्रसिद्ध
तातही विशद। बहुधा बोलिले ॥ ७६ ॥
अमृतानुभवी चतुर्थाध्यायी।
शून्या शब्दार्थ जो खंडिला पाही।
तो अभाव शून्य समजती तयाही।
व्हावया बोधू ॥ ७७ ॥

–(रुक्मिणी पत्रिका)

अर्थ – वसिष्ठ ऋषींनी रामाला केलेल्या उपदेशात बौद्धांचे शून्य म्हणजे वेदान्ताचे ब्रह्म होय असे अनेक ठिकाणी सांगितले आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीतही ब्रह्माला 'शून्य' म्हटले आहे. पण या दोन्ही आचार्यांनी या शून्याचा 'आत्म्याचा अभाव' असा अर्थ घेतलेला नाही, तर शून्य म्हणजे 'अविद्यानिर्मित जगताचा अभाव ज्याचे ठिकाणी आहे ते सद्रूप ब्रह्म' असा अर्थ केलेला आहे. अमृतानुभवात जे शून्याचे खंडन त्यांनी केलेले आहे तेही याच अर्थाला धरून आहे.

प्र० :– महाराज, योगवासिष्ठात व इतर ग्रंथात, ब्रह्मवादात शून्यवादाचाही किंचित् समन्वय केला आहे आणि 'सूतसंहितेत' किंचित बुद्धागमाला आश्रय दिला आहे. तेव्हा त्यांचा शून्यवाद निष्फळ कसा? शिवाय बुद्धाला जसे आपण परमेश्वर मानतो तसे इतर मानीत नाहीत, तेव्हा परमेश्वराचे ठिकाणी विप्रलिप्सा कशी संभवते?

उत्तर :– अहिंसादि धर्म सत्ववर्धक असल्यामुळे उपकारकच आहेत आणि शिवाय,

"निंदसि यज्ञविधेरहह: श्रुतिजातम्।
सदयहृदयदर्शित पशुघातम्।
केशवधृत बुद्ध शरीर जय जगदीश हरे॥

असे जयदेव स्वामींनी म्हटले असून कर्मकांडाची फक्त निंदा कली, ज्ञानकांडाची नाही, असे त्यावरील एका टीकाकाराने म्हटले आहे. स्वामी विद्यारण्यानी तर आपल्या सर्वदर्शन संग्रहात यद्यपि भगवान् बुद्ध एक एव बोधयिता तथापि बौद्धव्यानां बुद्धिभेदात् चातुर्विध्यम्॥" असे स्पष्ट म्हटले आहे.

प्र०:– बुद्धाच्या शिष्यांनाच काही समजले नाही असे कसे म्हणता?

उ०:– याचे कारण असे की बुद्धाने (१) सर्वं क्षणिकं क्षणिकम् (२) सर्वं दुःखं दुःखम्। (३) सर्वं स्वलक्षणं स्वलक्षणम्। (४) सर्वं शून्यं शून्यम्। अशा चार भावना 'वैराग्या' करता सांगितल्या आहेत. पण भावनेप्रमाणे वस्तु असतेच असा काही नियम नाही.








अशाच भावना पतंजलींनी जगाला स्वप्नरूप समजावे किंवा स्वप्नाचे ध्यान करावे म्हणून मनाच्या स्थिरते-करता सांगितल्या आहेत. पण तेवढ्यानेच कोणीही त्याचे अनुयायी जगन्मिथ्यात्व किंवा स्वप्नसत्यत्व समजत नाहीत. बुद्धाने ज्या चार भावना सांगितल्या त्या वस्तुत्वेकरून सांगितल्या नाहीत. (१) 'सर्व क्षणिक आहे' ही भावना; त्यामुळे विषयाचा नाश होणार आहे, अशा उद्देशाने ती सांगितली आहे. (२) 'दुःखाची भावना' वर्तमान विषयात दोष दिसण्याकरता ही सांगितली आहे. (३) 'स्वलक्षण-भावना' शमाचा पुनः नाश होऊ नये, म्हणून सांगि-तली आहे. (४) 'शून्यभावना' निर्विकल्प समाधि साध्य होण्याकरता सांगितली आहे. 'अभावयोग' म्हणून कूर्मपुराणातील ईश्वरगीतेतही अशीच भावना सांगितली आहे. बुद्ध दर्शनात हे शून्य सद्-असद्कोटि-रहित विद्यारण्यानी दाखविले आहे. –(साधुबोध)

## शून्य हे अविश्वसनीय

वादी म्हणे तुम्ही तरी ।
विश्वास ठेवावा बौद्धशून्यावरी ।
सिद्धान्ती म्हणे विश्वास ठेविता निर्धारी ।
शून्याचे शून्यपणचि जाय ॥ ११५ ॥
विश्वास जेथ जेथ राहे ।
तेथ तेथ भावोचि उत्पन्न होये ।
हे असो नागार्जुन स्वये बोलताहे ।
कि बौद्धशून्य ते वेदान्तशून्य ॥ ११६ ॥
(सं. मु. २०१ । पू.)

प्र. :– शून्याचा अर्थ इतका वेदान्ताला धरून आहे तर वेदान्त्यांनी त्या शून्यावर विश्वास ठेवला पाहिजे !

उ. :– अरे, शून्यावर जर विश्वास ठेवला तर शून्याचे ठिकाणी भावच उत्पन्न होईल म्हणजे सत्ताच मानावी लागेल व असे झाले तर शून्याचे शून्यत्वच कोठे राहिले ?

प्र. :– वेदान्ती लोक आपल्या दृष्टीने सर्वांचाच समन्वय करून घेतात पण ते ते धर्मवेत्ते तो समन्वय मानतात काय ?

उ. :– काही विचारी पुरुष मानतातच. कथासरि-त्सागरात नागार्जुन हे भगवान् बुद्धाच्या गतीला गेले असे स्पष्ट म्हटले आहेः–

अकार्यं मा कृथा राजन्नशोच्यो ह्येष ते सखा
नागार्जुनोऽपुनर्जन्मागतो बुद्धसमां गतिम् ॥

बरे हे असो. स्वतः नागार्जुनच काय म्हणतात ते पाहू–

## बौद्ध माहात्म्यानुसार 'शून्या' चा अर्थ

शून्याचा अर्थ देखील बौद्धग्रंथात नागार्जुनादिकांनी असा उत्तम करून ठेवला आहे, तो येणेप्रमाणे–

सर्वालंबनधर्मैश्च सर्वतत्वैरशेषतः ।
सर्वक्लेशाशयैः शून्यं, न शून्यं परमार्थतः ॥

अर्थ– जगातील सर्व धर्म व धर्मी, क्लेश आणि वासना यानी ते रहित आहे म्हणून ते शून्य म्हणाव-याचे– असत् आहे म्हणून शून्य म्हणावयाचे नाही.

याप्रमाणे बौद्धदर्शनसहकारी नागार्जुनाचे वचन असून 'आलोकमाला' नामक ग्रंथात असेच म्हटले आहेः–

"विरुद्धत्वात्तमोवृत्तेर्नावकाशं ददाति या ।
सावस्था कापि विज्ञेया न हि सा शून्यतोच्यते ॥
न पुनर्लोकरूढयैव नास्तिक्यार्थानुपातिनी ॥"

अर्थ– विरुद्ध अशा तमोवृत्तीला जी अवकाशच देत नाही, अशी जी ती शून्य शब्दाचा अर्थ आहे. अत्यंत असत्पणा किंवा अत्यंत अभाव असा लोकात रूढ असलेला शून्याचा अर्थ आम्ही घेत नाही.

याप्रमाणे कूर्मपुराणात अभावयोगही सांगितला आहे. बुद्धाने जो 'धम्मपदादि' ग्रंथात नीतिबोध केला आहे, तो आर्यधर्मात पूर्वीच संगृहीत आहे.

याप्रमाणे विचार केला असता चार्वाकवादीसारखा शून्यवादही वेदान्तोपजीव्य आहे. जीवन्मुक्तांच्या मौनाला तो कारण परंतु वैदिकांना स्वतंत्र मोक्षदायक नाही एवढेच आमचे म्हणणे आहे.

## बौद्धधर्म त्याज्य असण्याचे कारण व अधिकार भेदाने प्रामाण्य

"बौद्धादिधर्म निश्चिती ।
ते तव वस्तूत विरोध करिती ।
आत्म्यासचि शून्य मानिती ।
यालागी ते अनुभवेचि त्यक्त ॥ ५२ ॥
आत्मा शून्य कष्टावया पाही ।
हेतु सर्वथा कोणीच नाही ।



अनुक्रमणिका






हे मी बोलिले नाना ठायी ।
नाना ग्रंथी ।। ५३ ।।
आता आगमेचि मानवी शून्यता ।
तरी अपराध कोण वेद मानिता ।
वेद अनुभवयोग्य तत्वता ।
म्हणोनि शून्यपंथा त्यागिले वैदिके ।। ५४ ।।
वस्तुनिरूपणापुढे जाण ।
वेदोक्त कर्महीं मानिले गौण ।
यालागी संन्यासाश्रमाकारण ।
अधिकार नाही कर्मकांडी ।। ५५ ।।
अधिकार भेदे बौद्धादि तंत्र ।
प्रमाणही मानिती मुनीश्वर! – ।। ५६ ।।

भावार्थ – ज्या आत्म्याच्या अनुभवाने जीव मुक्त होतो त्या आत्म्यासच बौद्ध विरोध करतात. आपल्याला सतत आत्म्याचा अनुभव येत असताही ( मी आहे ) "आत्मा नाही" असे म्हणून ते आत्म्याचा अभाव मानतात. पण हे अनुभवाच्या विरुद्ध असल्यामुळे या मताचा अनुभवानेंच त्याग होतो. 'आत्मा हा शून्यरूप आहे' हे कळण्याकरता कोणतेही प्रमाण उपलब्ध नाही. बरे, बौद्ध शास्त्रे सांगतात म्हणून आत्मा शून्य आहे, असे आप्तवचन प्रमाण मानावयाचे असेल तर आपण वैदिक धर्मीयांना वेद हेच प्रमाण मानण्यास काय हरकत आहे ? आणि वेदात सांगितलेल्या आत्म्याचा अनुभवही येतो. म्हणून युक्ति आणि अनुभव या दोन्ही रीतीने वेदमार्ग हाच सिद्ध होतो, आणि शून्यपंथ हा खरोखरच शून्य ठरतो !

प्र. :– बौद्ध तत्वज्ञान तुम्ही त्याज्य मानता तर पूर्वी त्याचा तुम्ही वैदिक आत्म्याशी समन्वय कसा केला ?

उ. :– अधिकारभेदाने सर्वांचा समन्वय होत असतो. अधिकार म्हणजे ज्याला जे समजते, आकलन होते, तो त्याचा अधिकार ! गुरूचा उपदेश या अधिकारानुसार असला म्हणजे शिष्याची मुख्य ध्येयाकडे वाटचाल करण्याची तयारी होते. गुरूपदेशाप्रमाणे तो वागला असता त्याला कठीण कठीण गोष्टी समजू शकतात, त्याचा अधिकार वाढत जातो. अशा प्रकारे तो खालच्या पायरीवरून वरच्या पायरीवर, वरच्या पायरीहून अधिक वरच्या पायरीवर अशी ऊन्नति होत होत शेवटी तो आत्मप्राप्तीचे ध्येय गाठतो. असेच बौद्ध धर्माचे! बौद्ध लोकांनी आपला धर्म पाळल्यानंतर ते पुढील जन्मी वैदिक होतात. विहित कर्ममार्गादि पूर्ण श्रद्धेने आचरल्यानंतर त्यांची बुद्धि सूक्ष्म होते आणि ते आत्मज्ञानाचे अधिकारी होतात. हा अधिकार आला की त्यांना वैदिक कर्मे करण्याची देखील आवश्यकता नाही; त्यानी संन्यासधर्माने मुक्त व्हावे ! अशा या परंपरेने जगातील यच्चयावत् धर्मांचा, त्याना एकाखालच्या एक अशा पायऱ्या समजून, अद्वैत आत्मस्वरूपाच्या ध्येयवादानुसार समन्वय केलेला आहे. साधारणतः प्रत्येक मनुष्य आपापल्या धर्माप्रमाणे वागला असता क्रमशः मुक्तीचा मार्ग आक्रमण करतो आणि शेवटी वैदिक धर्मात येऊन वैदिक धर्मानुसार आत्मज्ञानाचा अधिकारी होत असतो. पण मुमुक्षा जर अत्यंत तीव्र असेल तर क्रमशः उन्नति करून घेण्याची गरज नाही. त्याला भागवतधर्मद्वारा आत्मज्ञान होऊ शकते.

अशा प्रकारे परमगुरु श्री गुलाबरावमहाराजांनी बौद्ध धर्माचा हिंदुधर्माच्या विशुद्ध दृष्टिकोनातून कसा विचार केला आहे ते आपण या लेखात पाहिले. पण बौद्धधर्माचा अभ्यास करताना अभ्यासकाने कोणता निर्णायक निकष दृष्टिसमोर ठेवून अभ्यास करायला हवा याचे एका ओवीत विवेचन केलेले आहे. ती ओवी अशी–

"आपुलेचि केले आपणा फळे ।
निर्वाण तंव अद्वैत ब्रह्मचि उगळे ।
हे हृदयी करोनि मोकळे ।
बौद्धधर्माध्यन कीजे ।।" (संप्र. सुरतरु २३८।२)

भावार्थ– आपण केलेल्या भावनेचे फळच आपल्याला नेहमी मिळत असते. आपण आपल्या आत्म्याबद्दल शून्य भावना केली तर शून्याचाच अनुभव येईल. परंतु खरोखर तो अद्वैत आत्म्याचाच अनुभव असतो. आत्म्यावर शून्याचा-अभावाचा खोटा आभास आपल्या भावनेमुळे होतो. असे हे बौद्धांचे निर्वाण म्हणजे खरोखर अद्वैत आत्म्याचाच एक अनुभव आहे. हे हृदयात पक्के ठसवून बौद्ध धर्माचे अध्ययन करावे म्हणजे बुद्धधर्मरहस्य उत्तमप्रकारे आकलन होऊ शकते.

## बौद्धधर्म हिंदुधर्मातीलच एक पंथ

आतापर्यंत आपण पाहिले की हिंदुधर्म बौद्धधर्माला परका समजत नाही. श्रीशंकराचार्य बौद्ध धर्माचे

खंडन करतात ते फक्त शून्यवादाचे! गौतमबुद्धाचे खंडन करीत नाहीत. किंवा आर्यधर्माला अनुसरून असलेल्या त्यांतील आचरणाचेंही खंडन करीत नाहीत. तसेंच श्रीज्ञानेश्वरमहाराजही शून्याचेंच फक्त खंडन करतात. आणि तत्त्वज्ञान दृष्टीने नागार्जुनादि बौद्ध महात्मे देखील शून्याचा खरा अर्थ वेदान्ताचे ब्रह्म असाच करतात, अभाव करीत नाहीत. ईश्वराबद्दल भगवान् बुद्ध मौन धारण करतो. या सर्व दृष्टीने विचार केल्यानंतर असे दिसते की, व्यापक अशा हिंदुधर्माच्या अहिंसा या एका अंशाला आधार घेऊन हा धर्म निघाला आहे. खरोखर हा हिंदुधर्मातील एक पंथच आहे. परंतु बुद्धानंतर इतरांनी या पंथतत्त्वज्ञानाला हिंदुधर्मापासून अलग काढले आणि त्यामुळे हा धर्मरूपाला आला. पण खरोखर हिंदुधर्मातील इतर पंथांप्रमाणे हाही एक पंथ आहे. जेव्हा वैदिक धर्मात राहून जे दुष्ट लोक आचारहीन झाले तेव्हा वैदिक धर्माचा त्यांचा अधिकार नाहीसा झाला त्यावेळी त्यांची उन्नति व्हावी याकरता भगवंताने बुद्धावतार घेतला. अहिंसा या हिंदुधर्माच्याच एक अंशावर भर देऊन नवीन पंथ काढला. आणि पतित लोकांची अधोगति टळावी यास्तव त्यांना हा नवा मार्ग दाखवून दिला.

अशा या भगवंताच्या करुणाघन अवताराला श्रीमहाराजांच्याच शब्दात नमन करून हा लेख पूर्ण करू —

“ पुढे प्रवृत्त झालिया कली ।  
जो असुरालागी मोह घाली ।  
तो बौद्धावतार वनमाळी ।  
पाखंडापासोनि रक्षो आम्हा ॥  
अवतार जरी एकविसावा ।  
परी करुणेचा पूर्ण विसावा ।  
अहिंसेचिया पूर्ण भावा ।  
प्रगटविले जेणे ॥

— ( भागवतरहस्य )














## वाचकांचा पत्रव्यवहार —

### गणपति आणि कालिदासाचे गुप्तकालीन अस्तित्व

' नवभारत ' मासिकाच्या नोव्हें. १९६३ च्या अंकात श्री. वझ द. धों. यानी एक पत्र लिहून डॉ. मिराशी यांच्या श्री. अ. ज. करंदीकर यांच्या ' बुद्ध ते कालिदास ' या ग्रंथाच्या परीक्षणातील ' गुप्तकालीन एकाही लेखात गजाननाचा उल्लेख नाही ... ' या विधानाचे खंडन करण्याचा प्रयत्न केला आहे. गुप्तकाळात गणपतीची उपासना लोकप्रिय झाली होती; कालिदासाच्या ग्रंथात गणपतीचा कोठेही उल्लेख नाही, तेव्हा कालिदासाचा काळ बराच मागे नेला पाहिजे, असा श्री. करंदीकरांचा सिद्धांत आहे. त्यानी कालिदासाला इ. स. पूर्व पहिल्या शतकातील विक्रमादित्याच्या काळात नेले आहे. त्यांच्या या मताचा येथे विचार करावयाचा नाही. परंतु गणपतिउपासना आणि कालिदासाचे गुप्तकालीन अस्तित्व याविषयी एकदोन विचार मांडणे आवश्यक वाटते.

गुप्तकाळात गणपतीची उपासना चांगलीच लोकप्रिय झाली होती याला काहीही आधार नाही. श्री. वझे यानी उल्लेखिलेली उदयगिरी येथील मूर्ति ५ व्या शतकातील आहे एवढेच म्हटले आहे. चंद्रगुप्त विक्रमादित्य इ. स. ४१५ मध्ये मरण पावला. इ. स. ४१५ ते ५०० पर्यंत ५ वे शतकच होते. तेव्हा ही शिल्पप्रतिमा इ. स. ४१५ नंतरची म्हणजे विक्रमादित्यानंतरची असूनही ५ व्या शतकातील असू शकते. कालिदास विक्रमादित्याच्या ( चंद्रगुप्ताच्या ) दरबारी होता या मताला यामुळे बाध येत नाही. इ. स. ४१५–५०० या काळात केव्हातरी तयार झालेली गणपतीची शिल्पप्रतिमा कालिदासाला माहीत नसणे स्वाभाविक आहे. गुप्तराजवटीच्या अगदी शेवटी शेवटी गणपति उपास्यदैवत बनला असावा. म. म. काणे तर ही घटना ५ व्या शतकानंतरची मानतात. तेव्हा कालिदासाला गणपति अविदित होता एवढ्याच कारणासाठी त्याला गुप्त काळापूर्वी नेण्याचे कारण नाही. ( करंदीकरनी इतर कारणे दिली आहेत. )

गणेशाची प्रसिद्धि विद्येची देवता म्हणून आहे; कोणत्याही मंगल कार्याचा प्रारंभ त्याच्या पूजनाशिवाय होत नाही. इतक्या महत्त्वाच्या या शंकरपुत्राचा कालिदासाने एकदाही उल्लेख केलेला नाही याचे श्री. वझे याना आश्चर्य वाटते. वस्तुस्थिति अशी आहे की कालिदासाला हा विद्यादाता, विघ्ननाशक गणपति माहीतच नसला पाहिजे. गजवदन, लंबोदर, विघ्नहर्ता, विद्यादाता असा हा गणपति गुप्तकाळाच्या शेवटी शेवटी उदयाला आला. तत्पूर्वी तो विघ्नकारक, विद्येचा नाश करणारा, अमंगल, असाच होता. याज्ञवल्क्य, बोधायन, मनु इत्यादींच्या स्मृतिग्रंथात गणपतीची निंदा आहे. बोधायनाच्या धर्मसूत्रात तर ' विघ्न ' हेच गणपतीचे नांव आहे. गणपतीची निर्मितीच मुळी संकटांच्या निर्मितीसाठी झाली. ( याज्ञ. स्मृ. १·२७१ ) तेव्हा असा हा विघ्नकर्ता गणपति इ. स. च्या पांचव्या शतकापर्यंत अप्रियच होता. ५ व्या शतकाच्या उत्तरार्धात केव्हातरी गणपति उपास्यदैवत बनला. यावेळी कालिदास हयात नसवा, अथवा त्याचे लेखन होऊन गेले असावे; किंवा गणपतीची वाढती लोकप्रियता अद्यापि त्याच्या कानावर आली नसावी. या काळात एकाएकी गणपतीचा गौरव का सुरू झाला हा स्वतंत्र प्रश्न आहे. या प्रश्नाचा विचार मी ' मराठवाडा ' दिवाळी अंक (१९६३) मध्ये केला आहे.

श्री. वझे हे करंदीकरांप्रमाणे कालिदासाला गुप्तकाळापूर्वी न्यावयास तयार दिसत नाहीत. अशा परिस्थितीत कालिदासाने गणपतीचा उल्लेखही केलेला नाही. याचा एकच अर्थ होऊ शकतो की गणपतीची लोकप्रियता इ. स. ४१५ नंतरच केव्हातरी सुरू झाली असावी. त्यानी उल्लेखिलेले ग्वाल्हेरमधील शिल्प कालिदासाला उत्तरकालीनच असले पाहिजे. श्री. करंदीकरांच्या गणपतिविषयक विचारांवर स्वतंत्रच लेख लिहावा लागेल. त्यांच्या गणपतिविषयक विचारांनी म. म. मिराशी यांच्या विधानाला कोठेही धक्का लागत नाही एवढेच सांगितले म्हणजे सध्या पुरे !

– स. रा. गाडगीळ

## पुस्तक परिचय —

'A New Look At Communism'
Edited by Shri A. B. Shah and Nissim Ezekiel. Published by Indian Committee for Cultural Freedom, 148, Mahatma Gandhi Road, Bombay 1.

[ Price Rs. 3.00 ]

कम्युनिस्ट क्रांती होऊन ४६ वर्षे आता पुरी होत आहेत. या कम्युनिस्ट क्रांतीने जगाच्या राजकारणात संपूर्ण बदल करून व्यक्तिस्वातंत्र्यनिष्ठ लोकशाही ध्येयवादाला आव्हान दिले आहे. लोकसत्ता व कम्युनिस्ट-सत्ता अशा दोन विरुद्ध दिशांच्या टोकामध्ये जगाच्या राजकारणाची रस्सीखेच सुरू आहे.

कम्युनिस्ट क्रांतीने व कम्युनिस्ट ध्येयवादाने आर्थिक समृद्धीत नांदणारा मानवी समतेचा स्वर्ग पृथ्वीवर अवतरेल असे निश्चयात्मक आश्वासन दिले होते. भविष्यात काय घडेल याचे निश्चित आश्वासन विकसित विज्ञानच देऊ शकते; आणि विज्ञाननिष्ठ तांत्रिक प्रगतीच भावी इष्ट घटनांची घडण करू शकते. म्हणून जगातील मार्क्सवाद्यांनी तथाकथित वैज्ञानिक समाजवादाच्या आधारे भविष्याबद्दल विलक्षण आशावाद निर्माण केला आहे. कोणतेही वैज्ञानिक आश्वासन खरे किंवा खोटे हे प्रत्यक्ष अनुभवान्ती किंवा प्रत्यक्ष प्रयोगान्ती ठरू शकते. गेल्या ४६ वर्षांतील हा तथाकथित वैज्ञानिक समाजवादाचा म्हणजे कम्युनिझमचा प्रयोग तपासण्यास भरपूर पुरावा आता उपलब्ध झाला आहे. त्या पुराव्याची तपासणी जगातील सामाजिक शास्त्रांत्रे व विशेषतः अर्थशास्त्राचे पंडित विविध अंगांची छाननी करून आपल्या अध्ययनाचे निष्कर्ष ग्रंथरूपाने प्रसिद्ध करीत आहेत. अशा प्रयत्नांपैकीच एक महत्त्वाचा प्रयत्न मुंबई येथे ऑगस्ट ३० ते सप्टेंबर १, १९६३ तीन दिवसपर्यंत भरविलेल्या परिसंवादात अनेक विचारवंतांनी केला.

हा परिसंवाद मुंबई येथील आंतरराष्ट्रीय सांस्कृतिक संघटनेच्या भारतीय शाखेने म्हणजे इंडियन कमिटी फॉर कल्चरल फ्रीडम या संस्थेने भरविला होता. या परिसंवादातील चर्चेकरिता विद्वानांनी तयार केलेले लेख त्या चर्चेचे इतिवृत्त व उद्घाटकांचे भाषण एकत्रित करून हे पुस्तक प्रकाशित केले आहे. पुस्तकास संपादकांची विस्तृत प्रस्तावना आहे. लेखांच्या विषयांची निवड समर्पक व एकमेकांशी सुसंबद्ध अशी केली आहे.

कम्युनिस्ट ध्येयवादाच्या चर्चेपासून परिसंवादाची सुरुवात होते. श्री. अ. भि. शाह यांनी कम्युनिस्ट ध्येयवादातील अत्यंत मूलभूत व प्रभावी अशा चार कल्पनांचा परामर्श घेतला आहे. त्या चारही कल्पनांना पौराणिक कथांचे ( Myths ) मूल्य आहे, त्यांना वास्तवाचा आधार नाही म्हणून शास्त्रीय कल्पनांचा दर्जा येऊ शकत नाही असे मार्मिक रीतीने थोडक्यात त्यांनी दाखविले आहे. या चार कल्पना म्हणजे ( १ ) शास्त्रीय समाजवाद, ( २ ) क्रांति, ( ३ ) सामाजिक न्याय, आणि ( ४ ) कामगारांचे आंतरराष्ट्रीयत्व या होत. या चारही कल्पनांमध्ये वैज्ञानिक समाजवाद ही कल्पना १९ साव्या शतकाच्या पूर्वार्धात मार्क्स व एंगेल्स यांनी काढली. मार्क्स व एंगेल्सच्या पूर्वी व समकाली जे समाजवादाचे भिन्न भिन्न संप्रदाय होते त्यांना अद्‌भुतरम्य कल्पना ( Utopia ) म्हणून मार्क्सने व मार्क्सवाद्यांनी खंडित केले. वस्तुतः मार्क्ससारख्या वैज्ञानिक पद्धतीने भांडवलशाही अर्थशास्त्रीय प्रमेये तपासणाऱ्या अद्वितीय विचारवंताने सामाजिक शास्त्रे ज्या काळात अत्यंत बाल्यावस्थेत होती, पदार्थविज्ञान व रसायन या सारख्या बौद्धिक विज्ञानाचा दर्जा ज्या वेळच्या सामाजिक ज्ञानास यत्किंचितही स्पर्श करीत नव्हता अशाकाळी म्हणजे एका शतकापूर्वी समाजवादासारख्या सामाजिक ध्येयवादाला 'वैज्ञानिक' असे अभिमानास्पद विशेषण द्यावे, यात केवळ अभिमानच व्यक्त होतो. सामाजिक ध्येयवादाला वैज्ञानिक भविष्याचे स्वरूप येण्यास आवश्यक असलेली सामाजिक विज्ञानाची प्रगति मार्क्सनंतर एक शतक लोटले तरी झालेली नाही. मानवी मन ही एक महत्त्वाची सामाजिक शक्ति आहे. मनोविज्ञान हे अजूनही प्रगल्भावस्थेतले विज्ञान होय अशी ग्वाही देता येत नाही. बहुसंख्य सामाजिक घटनांची संख्यानकीय ( Statistical ) स्थिति व त्यांची एकमेकातील संगति निश्चित करण्याचा प्रयत्न सामाजिक विज्ञान सध्या करीत आहे. महत्त्वाची भविष्ये कोणत्याही सामाजिक क्षेत्रात वर्तविण्याइतके सामर्थ्य सामाजिक विज्ञानात आलेले नाही म्हणून सामाजिक विज्ञान हे

अप्रगल्भावस्थेत आहे असे म्हणणे भाग पडते. एकंदरीत श्री. अ. भि. शाह यांचा लेख या सर्व लेखांची यथायोग्य पार्श्वभूमि होय असे म्हणावे लागते.

माजी कम्युनिस्ट तत्त्ववेत्ते फिलिप् स्प्रॅट यांचा लेख क्रमाने दुसरा आहे. त्यात शिक्षित बुद्धिवंतांना मार्क्सवादाची मोहनी का पडते याची समर्पक चर्चा केली आहे. पहिले दोन लेख झाल्यानंतर भारतीय कम्युनिस्ट पक्ष, जागतिक विविध कम्युनिस्ट पक्ष, जगातील कम्युनिस्ट आंदोलन त्यांचे मतभेद व भांडणे यांचे विस्तृत मूल्यमापन करणारे लेख आले आहेत. कम्युनिस्ट– विरोधी आंतरराष्ट्रीय राजकीय शक्तींनी रशिया व चीन यांच्यामधील संघर्षांकडे कोणत्या दृष्टिकोणातून पाहावे याचे अत्यंत समतोल विवेचन कोलंबिया विद्यापीठाचे प्रा. बृझेझिंस्कि [ Z. Brzezinski ] यांनी केले आहे. जागतिक कम्युनिस्ट पक्षांच्या परस्पर संबंधांवर विशेषतः मास्को व पेकिंग या दोन वरिष्ठ केन्द्रांशी असलेल्या त्यांच्या संबंधावर झगझगीत प्रकाश टाकणारा कॅलिफोर्निया विद्यापीठाचे प्रा. रॉबर्ट ए स्कॅलॅपिनो यांचा लेख आहे. अखेरचा परंतु उद्बोधक असा कम्युनिझमच्या प्रयोगाचे वैफल्य सूचित करणारा व रशियन आर्थिक विकासाचे विवरण करणारा लेख श्रीमती जॅनेट चॅपमन यांचा होय.

जागतिक कम्युनिस्ट क्रांतीचे सद्यःकालीन चित्र उत्तम रीतीने चित्रित करणारा हा पुस्तकनिबद्ध परिसंवाद राजकीय विचारवंतांना प्राप्त झालेली बहुमोल देणगी होय, असे मानावे लागते.

–– तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

[ **तिबेटचा बळी**; ले. त्र्यं. र. देवगिरीकर, प्रकाशक चित्रशाळा प्रेस, ५६२ सदाशिव पेठ, पुणे २ किं. रु. २·५० . ]

'तिबेटचा बळी' अत्यंत व्यासंगपूर्ण रीतीने लिहिलेला असा हा ऐतिहासिक व राजकीय निबंध आहे. "तिबेटच्या बलिदानाचा हा इतिहास विद्यमान पिढीच्या डोळ्यांदेखत घडला आहे. तो शोकपूर्ण आहे व माणुसकीला थरारून सोडणारा आहे" या पुस्तकात तिबेटच्या नुकत्याच घडलेल्या शोकांतिक कथेची केवळ मांडणी केली नसून तिबेटच्या समग्र इतिहासाचा सारांशही यात ग्रथित केला आहे. तिबेटी जनता, धर्म, साहित्य, व राज्य यांचा थोडक्यात परामर्श यात घेतला आहे. तिबेट चीनचा कसा नव्हे व ते स्वतंत्र राष्ट्र म्हणून कसे होते याही मुद्याचा व्यवस्थित खुलासा या पुस्तकात सापडतो. चीन, तिबेट व हिंदुस्थान या त्रयींचे संबंध इतिहासकालात कसे होते याची सप्रमाण मांडणी यात केली आहे. चीनच्या अमानुषपणाचा पक्का पुरावा यात दिला आहे. एका प्राचीन राष्ट्राचा हिमालयाच्या उत्तरेत चीनने वध केला आहे याचे हृदयविदारक चित्र कुशलतेने लेखकाने रेखाटले आहे.

'तिबेटचा बळी' कसा दिला गेला याचे विवरण करताना तिबेटसंबंधाची भारतीय वर्तमान राज्यकर्त्यांची लेखकांनी वर्णिलेली राजनीति वाचून कोणत्याही भारतीयाचे मन विषण्ण होईल. तिबेटचा शेवट होण्यास आपले भारतीय राज्यकर्ते कसे निमित्तभूत झाले याचे सप्रमाण विवेचन वाचून मन उद्विग्न होते. हे पुस्त अत्यंत संग्राह्य आहे.

– तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी









हिमालयातील राष्ट्रांच्या संघराज्याच्या मागणीची परिणती चीनचे इच्छेप्रमाणेच होईल असे मात्र नाही. एक वर्षापूर्वी चीनने जेव्हा ही कल्पना पुढे मांडली तेव्हा नेपाळने त्याला जोराचा पाठिंबा दिला. परंतु भूतानमध्ये व सिकीममध्ये त्याबद्दल मतभेद निर्माण झाले. त्यानंतर आता पुन्हा या कल्पनेने उचल खाल्लेली दिसून येते. आता नाग व तिबटी या दोन्ही लोकांचा पाठिंबा मिळणे शक्य झाले आहे. दुसरे बाजूस रशियापण या कल्पनेस पाठिंबा देत आहे. प्रत्यक्षात यामुळे भारत व चीन या दोघांनाही आपल्या फाजा संघराज्याचे सरहद्दीपलीकडे न्याव्या लागतील दलाई लामाला तिबेटमध्ये परत जाता येईल व तिबेट आणि नेपाळ एकमेकांचा राजकीय तोल सांभाळू शकतील. हे संघराज्य अस्तित्वात आणणे फारसे कठीण नसून रशियाच्या आशियातील हितसंबंधास ते पोषक्च होईल. नेपाळी पंतप्रधानांची रशियाची वारी या दृष्टीने महत्त्वाची होती.

भारताचे दृष्टीने या संघराज्याची स्थापना हितावह होईल. चीन व भारत यांचे मध्ये 'बफर' (उष्ट्र) राज्य निर्माण होऊन गेल्या दहा वर्षांत घालविलेली राजकीय पत परत मिळविण्याची त्यास संधि मिळेल. दुसरे म्हणजे सिकीम, भूतान, नेफा व नागभूमी यांचे संरक्षणाचे जबाबदारीतून भारत मुक्त होईल. मोठ्या प्रमाणात आक्रमण झाल्यास या देशांना संरक्षण देणे अशक्य आहे याची जाणीव सर्वांसच आहे.

पण चीनचे दृष्टीने याचा परिणाम काय होईल? सध्यातरी त्यात चीनचे नुकसान नाही असे वाटते. तिबेट मधील चिनी लष्कर तिबेटी गनिमांचे तावडीत सापडण्याची भीती सध्या आहेच. कारण लष्करी संघर्ष झाल्यास भारत या गनिमांशी संगनमत करून त्यांना लष्करी मदत करील. दलाईलामाला परत येऊ दिल्यास आशियात घसरलेला आपला राजकीय भाव चीनला पुन्हा वाढविता येईल. शिवाय भारताकडे चाल करण्यास उत्तर ब्रह्मदेशातील रस्ता मोकळाच राहील. चीनची लष्करी पकड सैल करण्यास या संघराज्याचे कल्पनेचा उपयोग होईल हे मात्र निश्चित.

## दक्षिण व्हिएटनाम मधील राजकीय क्रान्ति

दीम पदच्युत झाला. परंतु अमेरिकेची जबाबदारी संपली नाही.

व्हिएटनाममध्ये लष्करी अधिकाऱ्यांनी दीमसरकार उलथून पाडले असले तरी त्यांना लढाई अजून जिंकावयाचीच आहे. नुगो बंधूंच्या सत्तेचा पाडाव होण्याचे एक प्रमुख कारण म्हणजे कम्युनिस्ट कारवायांना आळा घालण्यास ते असमर्थ ठरले हे होय, अध्यक्ष केनेडी यांचे सांगण्यावरून अमेरिकेचे संरक्षण खात्याचे चिटणीस श्री. मॅक्नामारा व जनरल टेलर यांनी व्हिएटनामबद्दल तयार केलेला रिपोर्ट खरा होता हे या लष्करी अधिकाऱ्यांनी दाखवून दिले. या रिपोर्टानुसार व्हिएटकाँग या कम्युनिस्ट संघटनेचा पराजय करणे शक्य असले तरी दीम व न्हु यांचे हातून चांगल्यापेक्षा वाईट गोष्टीच जास्त होत असल्यामुळे ते होत नाही असे नजरेस आले. याचाच अर्थ कम्युनिस्ट संघटनेचा पराजय व दीम राजवट परस्परविरोधी आहेत हे स्पष्ट झाले. परंतु यावरून अमेरिकेने या बंधूंचे विरुद्ध कट केला असे मात्र नाही. हा रिपोर्ट प्रसिद्ध झाल्यामुळे ज्या कोणाला असा कट करावयाचा असेल त्याचा मार्ग मोकळा झाला. त्याचप्रमाणे अमेरिकेने न्हु यांचे सेंट्रल इंटेलिजन्स एजन्सीच्या तनख्यास काट लावून व त्यांचे खास सेनेस सायगावचे बाहेर पाठवून द. व्हिएटनामी राष्ट्राध्यक्षांचे संरक्षण काढून कटाला मदत केली असे फारतर म्हणता येईल.

पूर्वीच्या राजवटीचे उपराष्ट्राध्यक्ष श्री थो यांचे सरकार व एक नोव्हेंबरला तयार झालेला लष्करी गट पण काम चलावू असण्याची शक्यता आहे. या लष्करी बंडाचा पुढारी दो व्हॉन मिन्ह यास राजकीय महत्त्वाकांक्षा नसून तो फारच सरळ वृत्तीचा आनंदी माणूस आहे. बंडाचे खरे पुढारी अजून अज्ञातवासातच आहेत असे वाटते. जनरल मिन्हचे काही सहकारी त्याला वैयक्तिक कारणाने मिळालेले असून त्यात न्हूचे विरोधकाप्रमाणे अमेरिकेचे विरोधकही आहेत. म्हणजे सध्याचे सरकार अस्थिर असून सायगावचे राजकारणास स्थैर्य येण्याची फार गरज आहे.

पूर्वीच्या राजवटीच्या चुका लक्षात घेऊन त्या कशा टाळाव्या हे पहाणे आवश्यक झाले आहे. दीम हा











रगेल, सहजासहजी दडपला न जाणारा व एकमार्गी होता. म्हणूनच १९५४ सालच्या गोंधळ, अनिश्चिति, आणीबाणी व पराजय यांचे वातावरणात अमेरिकेने त्याला पुढारी म्हणून मान्य केले. त्याने जिनिव्हा करार मानण्याचे साफ नाकारले, आपल्या विरोधकांचा पाडाव केला, कम्युनिस्ट सत्तेखालील उत्तर व्हिएटनाममधून आलेल्या दहा हजार निर्वासितांचा प्रश्न सोडविला व थोड्याफार प्रमाणात जमीन सुधारण्याची मोहीम यशस्वी केली. १९५९ साली कम्युनिस्ट गनिमांनी दक्षिणेत गोंधळ घालण्यास सुरवात करीपर्यंत त्याने देशाच्या आर्थिक व्यवहारातसुद्धा बरेच स्थैर्य आणले.

यानंतर मात्र दीमचे नेतृत्व अपुरे पडू लागले. स्वतःचे कुटुंबाबाहेरील मदतनीसांवर तो विश्वास ठेवीनासा झाला. तो न्हुवर सर्वस्वी अवलंबून राहू लागला. न्हुची राज्यकारभाराची कल्पना दडपशाही व कारस्थाने यावर आधारलेली होती. लष्करी सामर्थ्यासमोर निधड्या छातीने उभा रहाणारा दीम आपल्या भावजयीच्या– सौ. न्हुचे– ताटाखालचे मांजर बनला. ही कारस्थानी बाई स्त्रियांची कैवारी असून तिने वेश्याव्यवसाय, घटस्फोट, जुगार व नाच यांचे संपूर्ण उच्चाटन केले. त्यामुळे खुशालचेंडु कोचीन चिनी पुरुषास द. व्हिएटनाम हो–चिन–मिन्हच्या उत्तर व्हिएटनाम सारखेच रुक्ष व सनातनी वाटू लागले. त्यातच न्हुने कॅन–लिओ–नुन–व्ही नावाचा पक्ष कामगारांचे व्यक्तिमत्त्व बनविण्याचे नावाखाली सुरू केला. या पक्षाचे सभासदांचे काम कामगारावर पाळत ठेवून कोण किती स्वामीभक्त ( न्हु भक्त ) आहे हे पहाण्याचे होते. या पक्षाचे कामगिरीमुळे हजारो कामगार शैक्षणिक शिबिरात वा तुरुंगात डांबले गेले. त्यांनी अनेक उदारमतवाद्यांवर सुद्धा कम्युनिस्ट धार्जिणेपणाचे शिक्के मारले. त्यातच या वर्षी बुद्ध धर्मीयांनी निदर्शनास सुरवात करून धुमसत असलेल्या असंतोषास तोंड पाडले. त्याला उत्तर म्हणून न्हुने पागोडांचे विरुद्ध दडपशाहीस सुरवात केली.

या घरगुती दडपशाहीवरच सर्व थांबले नाही. व्हिएट कॉंग गनिमांची संख्या १९५९ साली तीन हजार होती ती न्हुचे दडपशाहीमुळे तिप्पट होऊन द. व्हिएटनाम म्हणजे एक युद्धभूमीच बनले. अमेरिकेने द. व्हिएटनामची संपूर्ण जबाबदारी उचलली असल्यामुळे या लढाईत ते जास्त जास्त गोवले जाऊ लागले. आपली मनुष्यपारख व आपले परिस्थितीचे आकलन चुकल्यामुळेच ही परिस्थिति निर्माण झाली असे त्यांना वाटू लागले असल्यास नवल नाही. १९५४ साली द० व्हिएटनामचे अतोनात फुगलेले लष्कर अमेरिकेने सुटसुटीत व कार्यक्षम बनविले. या सैन्याचे मुख्यकाम उत्तरेकडून होणाऱ्या हल्ल्याला तोंड देणे हे होते. परंतु तसे आक्रमण झालेच नाही. सध्या चालू असलेले युद्ध द० व्हिएटनाममधील कम्युनिस्ट साथीदार लढत असून लाओस मार्गे द० व्हिएटनाममधील शस्त्रांचा प्रचंड ओघ उत्तरेस वहात आहे.

१९६१ साली परिस्थिति इतकी बिकट झाली की, अध्यक्ष केनडी यांना काहीतरी उपाययोजना सुचविण्याकरिता जनरल टेलर यांचे नेतृत्वाखाली कमिशन पाठविणे भाग पडले. त्याचा परिणाम अमेरिकेची द० व्हिएटनाममधील लष्करी जबाबदारी भरमसाट वाढण्यात झाला. सध्या द० व्हिएटनाममध्ये अमेरिकेचे चौदा हजार लष्करी 'सल्लागार' (बहुतेक सर्व सैनिक) असून अमेरिका दिवसास दहा हजार डॉलर्स प्रमाणे तेथे खर्च करीत आहे. तरी सुद्धा व्हिएटकॉंग गनिमांच्या कारवाया वाढत असून उत्तरेकडील शस्त्रांचा प्रवाह चालूच आहे !

उत्तर व्हिएटनामवर प्रत्यक्ष हल्ला केल्याखेरीज संपूर्ण विजय मिळविणे अशक्य आहे. त्यात भीती चीनच्या हस्तक्षेपाची आहे. कारण उ० व्हिएटनामचे पाठीशी चीन उभा आहे हे उघडच आहे. अशा परिस्थितीत सुद्धा द० व्हिएटनाम मधील कम्युनिस्ट गनिमांचा नायनाट करणे अशक्य कोटीतील नाही. परंतु त्या करिता अमेरिकेने आपल्या चुका सुधारून द. व्हिएटनामला योग्य ती मदत केली पाहिजे. खेड्यापाड्यातील जनतेला कम्युनिस्टांपासून वेगळे काढून संरक्षण द्यावयास पाहिजे; त्याना राजकीय दृष्ट्या आपलेसे केले पाहिजे. हे काम उ. व्हिएटनामी व खिश्चन असलेल्या दीम पेक्षा बुद्धधर्मीय व द. व्हिएटनामी थो चांगले करू शकेल असे वाटते.

दहा वर्षापूर्वी फ्रेंचाना आलेला अनुभव व आपला अनुभव एकच आहे असे अमेरिकेला वाटत नाही.











व्हिएटकाँग ही संघटना कम्युनिस्ट असली तरी व्हिएटनामी आहे. त्यांचेमध्ये रशियन किंवा चिनी सैनिक नाहीत. द. व्हिएटनामसरकारचे बाजूने मात्र अमेरिकेचे अस्तित्व चटकन डोळ्यात भरते. ते सरकार साम्राज्यवाद्यांचे हस्तक आहे, ही खुपणारी टीका खरी वाटण्यासारखी आहे. व्हिक्टोरिअन घरातील मुलांप्रमाणे अमेरिकेचे लष्करी सामर्थ्य दृष्टीस न पडता नुसते ऐकिवात रहाणे जरूर आहे. त्यांनी रशिया, चीन किंवा झेकोस्लाव्होकिया प्रमाणे लांबून लष्करी मदत व सल्ला पुरविणे जरूर आहे. संपूर्ण विजय व्हिएटनामी जनताच मिळवू शकेल. कारण माओचे म्हणण्याप्रमाणे गनिमीकाव्याचे लढाईत जनतारूपी समुद्रातच गनीम माशासारखे राहू शकतात.

हे सर्व लक्षात ठेवून वागल्यास जय मिळणे जड जाणार नाही. उ. व्हिएटनाम व चीन कम्युनिस्ट असताना संपूर्ण विजय मिळणार नाही हे जरी खरे असले तरी द. व्हिएटनाममध्ये व्हिएट काँगचा नायनाट करून तेथील जीवनाला स्थैर्य व सुरक्षा आणून ती टिकवणे शक्य होईल.

हो-चिन-मिन्हचे म्हणण्याप्रमाणे उत्तर दक्षिणेत सलोखा होऊन एकसंधी राज्य प्रस्थापिणे व शांततेचे व तटस्थतेचे धोरण स्वीकारणे हे वरवर मोठे आकर्षक व साधे धोरण दिसत असले तरी त्याचा अर्थ चटकन समजू शकतो. द० व्हिएटनाम कम्युनिस्टांचे हवाली करणे एवढेच त्यातून निघेल! अमेरिकेने द० व्हिएटनामची जबाबदारी यश मिळविण्याकरताच घेतली असल्यामुळे अध्यक्ष केनेडी यांना हे धोरण कधीही पसंत पडणार नाही. जुनी सत्ता उलथून पडली असली तरी अमेरिका आपल्या जबाबदारीतून मुक्त मात्र झालेली नाही.

—( इकॉनॉमिस्ट ( लंडन ) ९ नोव्हेंबर १९६३ )

---





अनुक्रमणिका









# योग्य मेट्रिक परिमाणांत खरेदीविक्री करा

बहुधा जुन्या वजनांचे मेट्रीक वजनामध्ये सरळ रूपांतर करून वस्तु मागितल्या जातात. उदाहरणार्थ पावशेरकरितां २३३ ग्राम मागितले जातात, तसेच १ रतलाकरितां ४५४ ग्राम मागितले जातात. अशा तऱ्हेनें वस्तु मागणें हें दशमान पद्धतीच्या तत्त्वानुसार नाही. शिवाय यामुळें जुन्या पद्धतीप्रमाणेंच आपणांस किचकट हिशोब करावा लागतो, परंतु दशमान पद्धतीचा एक मुख्य हेतु अशा तऱ्हेची क्लिष्ट आंकडेमोड दूर करणें हा आहे.

वरील उदाहरणांत वस्तु मागण्याची योग्य पद्धत म्हणजे २०० ग्राम, ३०० ग्राम, ४०० ग्राम अगर ५०० ग्राम असे मागणें

| पूर्वी या मापानें घेत असाल | तर आतां मागा |
|---|---|
| १ औंस (= २८ ग्राम) | ३० ग्राम |
| १ पौंड (= ४५४ ग्राम) | ५०० ग्राम |
| २ पौंड (= ९०७ ग्राम) | १ किलोग्राम (१००० ग्राम) |
| ७ पौंड (= ३.१७ किलोग्राम) | ३ किलोग्राम |
| १४ पौंड वा स्टोन (= ६.३५ किलोग्राम) | ५ किलोग्राम |
| २८ पौंड (= १२.७० किलोग्राम) | १० किलोग्राम |
| ५६ पौंड (= २५.४० किलोग्राम) | २० किलोग्राम |
| ११२ पौंड वा हंड्रेडवेट (= ५१ किलोग्राम) | ५० किलोग्राम |
| १ टन (= १०१६ किलोग्राम) | १००० किलोग्राम |
| १ तोळा (= ११.६६ ग्राम) | १० ग्राम |
| १/१६ शेर वा छटाक (= ५८ ग्राम) | ५० ग्राम |
| १/४ शेर वा पावशेर (= २३३ ग्राम) | २०० ग्राम |
| १/२ शेर (= ४६७ ग्राम) | ५०० ग्राम |
| १ शेर (= ९३३ ग्राम) | १ किलोग्राम (१००० ग्राम) |
| २.१/२ शेर (= २.३३ किलोग्राम) | २ किलोग्राम |
| ५ शेर (= ४.६६ किलोग्राम) | ५ किलोग्राम |
| १० शेर (= ९.३३ किलोग्राम) | १० किलोग्राम |
| २० शेर (= १८.६६ किलोग्राम) | २० किलोग्राम |
| १ मण (= ३७ किलोग्राम) | ४० किलोग्राम |
| २.१/२ मण (= ९३ किलोग्राम) | १ क्विंटल (१०० किलोग्राम) |



योग्य रीतीनें मेट्रिक पद्धतीचा अवलंब करा

प्रसिद्धि संचालक, महाराष्ट्र सरकार, मुंबई

अनुक्रमणिका